मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

सत्यमेव जयते
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या सिद्धीसाठीं हातभार!

धरतीमातेनें प्रसन्न होऊन अनंत हस्तांनीं दिलेलें लक्षावधि टन धान्य सांठवणीसाठीं गुदामांतून ठेवलें जात आहे...

पण पिकें अमाप यायला हवींत तर प्रथम जमिनीला पाण्याचा पुरवठा वेळच्यावेळीं नि भरपूर होणें आवश्यक आहे. **किर्लोस्कर डिझेल एंजिनें** नेमक्या याच बाबतींत महत्त्वाची कामगिरी बजावीत असतात.

वर्षानुवर्षें खूप अन्नधान्य पिकावें म्हणून नदीनाले, विहिरी, तळीं यांतून पाणी वर खेंचून काढणाऱ्या पंपांना तीं शक्तीचा हमखास पुरवठा करतात.

अनेक वर्षांच्या अनुभवानें नि संशोधनानें पूर्णत्वास पोहोंचलेलीं आणि साऱ्या जगभर उत्कृष्ट दर्जा व हमखास कामगिरीबद्दल नांवाजलेलीं हीं एंजिनें आज तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत हजारों शेतकऱ्यांना अधिक धान्य पिकविण्याच्या कामीं मदत करून भारतीय सरकारपुढील एक महत्वाचा प्रश्न सोडविण्यास हातभार लावीत आहेत.




अनुक्रमणिका



साहित्य • कला •

वर्षारंभ अंक

मार्च १९६३ वर्ष [illegible]

## श्रेयनामावलि–

● **रंगीत चित्र**—'कविता कामिनीचें पांडित्य.'

● **पांच कथा**—जयवंत दळवी, पद्माकर गोवईकर, भी. गो. जांभळे, प्रभाकर पुराणिक, ललित वालावलकर ● **सहा ललित लेख**—आनंद साधले, आत्माराम नीलकंठ, रसिक मनोहर, उषाकांत, दि. श्री. कराडकर, माधव सातवळेकर ● **'माणुसकीच्या शत्रू संगें'**—चंद्रकांत गुते. ● **दोन कविता**—शिरीष पै. ● **तीन शृंगारिका**—केशव मेश्राम, ● **सदरें**—केशव मेश्राम, शां. शं. रेगे, भागवत, कलाब्धि. ● **शद्बांजलि**—रॉय किर्णाकर, सौ. मंगला बर्वे.

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४–या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.


टे. नं. ७७७६५
Gram : DALALART

एक असामान्य साहित्यिक–

# कै. स. आ. तथा भाऊसाहेब जोगळेकर



संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

'महाराष्ट्राच्या महात्म्यावर व महान् भवितव्यावर माझी पूर्ण निष्ठा आहे–' या मंगलाचरणानें 'सह्याद्रि'–दर्शनाचा पडदा उघडतो आणि– 'त्याच्या विविध दर्शनानें (वाचकाचा) कणा ताठ होतो, छाती रुंदावते, दृष्टिक्षेत्र विस्तारतें, आकांक्षा उंचावतात, निष्ठा दृढ होते, कर्तृत्व प्रखर पावतें, प्रतिकारशक्ति प्रज्वलित होते, दारिद्र्याची कदर वाटत नाहीं, संकटाची डर नष्ट होते' अशा भरत वाक्यावर तो पडदा हळूहळू खालीं उतरतो. कांहीं काळ वाचकाची सविकल्प समाधी उतरत नाहीं अजून त्याचें मत 'सह्याद्री'च्या कडेकपारींतून, शिखरपटारावरून, (गोदाप्रवाहाचा अस्पष्ट नाद घेत) भटकत राहतें. त्या विराट प्रस्तर-मंदिरांतून कांहीं केल्या त्याला बाहेर पडावेसें वाटत नाहीं !

स. आ. उर्फ भाऊसाहेब जोगळेकरांनीं जें खरें साहित्य लिहिलें त्याला सह्याद्रीचीच उपमा शोभून दिसेल. जीवनांत कांहीं तरी 'उत्कट आणि भव्य' भरलेलें आहे त्याचा आपण शोध घ्यायला हवा असें त्यांस सदोदित वाटत राहिलें–अगदीं शेवटच्या श्वासाचें अर्घ्यप्रदान करतांना देखील !

भाऊसाहेबांच्या निफावरल्या काळ्या शाईत गाथासप्तशतींतील श्यामलेच्या ऋतुस्नात पापणकाठाचें काजळ मिसळलेलें आहे असा आरोप करणारे रंगेल, रसिक वाचक 'सह्याद्री'-तील महाराष्ट्र–स्तोत्रानें खजील झाले आणि शेवटीं त्यांनीं एकमुखानें दाद दिली–वा: ! भाऊसाहेब वा: ! शर्थीच्या साहित्यिकानें लिहावें तर बस्स असें लिहावें–' अचल, उत्तुंग व सतेज;' 'मधुर गंभीर व सालंकृत' !

'सह्याद्रि' आणि 'गाथासप्तशती' हे दोन अद्वितीय ग्रंथ लिहिण्यासाठींच जणूं भाऊसाहेबांच्या लेखणीनें जन्म घेतला होता. चरितार्थाचें साधन या पलीकडे भाऊसाहेबांनीं वकीलीच्या पेशाकडे अधिक लक्ष दिलें नाहीं. वकीलीचाच प्रपंच करायचा त्यांनीं ठरविलें असतें तर डेक्कन जिमखान्यावर जयकरांच्या बंगल्याशेजारीं त्यांनीं तसाच एक फक्कड बंगला उठविला असता आणि पक्षघाताचा पहिला फटका बसतांच स्वित्झर्लंडच्या एका अलिशान रुग्णालयांत ते जाऊन राहिले असते !

मागें एकंदां वेरूळची लेणी पाहून आल्या-नंतर माझें असेंच झालें. 'कैलासा'चें तें प्रस्तरशिल्प पाहून मी मनाशीं म्हणे–एवढ्या प्रचंड, प्रमत्त आणि प्रलोभनीय शिल्पाचा अमूर्त संकल्प सोडणाऱ्या त्या पहिल्या शिल्प-काराला कुठून ती स्फूर्ति आणि प्रेरणा लाभली असावी ! प्रचंड, प्रमत्त आणि प्रलोभनीय साहित्य निर्माण करणाऱ्या साहित्यिकाविषयीं देखील असेंच गूढरम्य रहस्य जाणकार वाचकाला वाटत असते. 'गाथासप्तशती' बाहेर पडल्यानंतर भाऊसाहेबांना आलेली वाचकांचीं कांहीं पत्रें खरोखर कुणीं तरी छापायला हवींत ! अशीं पत्रें येत तेव्हां भाऊसाहेब काय करीत असें तुम्हांला वाटतें ? ओठ पुढें ओढून आणि जुळवून मिस्कीलपणें हंसून ते म्हणत–चला, वर माडीवर जाऊ, जरा 'सिव्हिलकोडा'कडे पाहूं या ! भाऊसाहेबांची लेखणी 'शाक्त' होती !

भाऊसाहेबांचें जीवन आणि लेखन पाहिल्या-पासूनच 'असामान्य' होतें. वहिवाटीची चाकोरी त्यांच्या मनोधर्माला अमान्य होती. जीवनांतील 'भव्य आणि उत्कट' शोधण्यासाठीं त्यांची सदैव धडपड चाललेली असे. अशा वेळीं कधीं त्यांच्या हाताला मोर्यकालीन नाणीं लागत





अनुक्रमणिका

संपादक, 'दीपावली' यास,

आपल्या दीपावलीच्या जानेवारी आणि फेब्रुवारीच्या अंकाबद्दल आपलें हार्दिक अभिनंदन करण्यासाठीं मी आलो होतो पण आपली भेट झाली नाहीं म्हणून हें पत्र पाठवित आहे.

दीपावलीचा कायाकल्प केल्याबद्दल आपलें अभिनंदन केल्याशिवाय रहावत नाहीं. चीननें भारतावर आक्रमण केल्यामुळें महाराष्ट्रीय साहित्यिक जागा झाल्याची जाणीव आपल्या दोनही अंकांत जितकी प्रकर्षानें दिसून आली तेवढी मला अन्यत्र आढळून आली नाहीं. संपादकीय दृष्टिकोनांतहि फार निरोगी बदल झाल्याचें चिन्ह आपल्या फेब्रुवारीच्या अंकांत आढळलें.

मला आशा नव्हे खात्री आहे कीं दीपावली राष्ट्रभक्तीची ज्योत यापुढें घराघरांतून आपल्या तेजानें फाकवील आणि स्वातंत्र्यानंतरच्या पंधरा वर्षांतील तमोयुगांतून--आतां खऱ्या उजेडाकडे नेईल.

श्री. जयवंतराव दळवी यांची लेखमाला ही एक दक्षिण कोंकणचें आगळें दर्शन दाखविणारी लेखमाला आहे. श्री. दळवी हे मराठी साहित्यांत 'कोंकण दर्शना'ची अशीच यापुढें भर घालोत असें मी आग्रहानें सुचवित आहे. त्यांची लेखमाला वाचून पुनः प्रत्ययाचा आनंद बऱ्याच दक्षिण कोंकणवासियांना वाटेल अशी मला खात्री वाटतें. आपला,

**डॉ. श्री. शां. आजगांवकर**

संपादक, 'दीपांवली' यांस—

श्री. स. आ. जोगळेकरांच्या निधनाविषयीं वाचलें. दीपावलींत त्यांच्याविषयीं कांहींतरी खास यायला हवें. अच्युत बर्वे आणि आपण स्वतः सुद्धां कांहीं तरी लिहावें. मी आणि आपले सारेच दीपावली–रसिक आपल्या दुःखांत सहभागी आहोंत. ग्रंथसंग्राहक या नात्यानें मला विशेष जिव्हाळा वाटायचा. त्यांतून माझाहि पहिला लेख त्यांनीं छापून त्याचें कौतुकहि केलें होतें.

दीपावलीचा बदललेला मोहरा आवडल्यावांचून कसा राहील. एका चित्रकारानें चालविलेलें मासिक म्हणून दीपावलीकडून रसिक वाचकांच्या ज्या अपेक्षा आहेत त्या पुऱ्या होतील अशी आशा गेल्या दोन अंकांनीं वाढविली आहे. अधूनमधून रंग भरल्यानें आकर्षकता वाढली आहे. शेवटचा मजकूर पण भरदार झाला आहे. श्रीराम कामतांची कादंबरी वाचण्यासाठीं उत्सुक आहे. फारा वर्षांमागें 'मौज' दिवाळी अंकांत वाचलेली त्यांची गोष्ट लक्षांत आहे. त्यानंतर अलिकडे दीपावलींतच पुनः वाचायला मिळाल्या त्यांच्या कथा.

दीपावली अधिकाधिक भरदार वाचायला मिळेल अशी खात्री वाटली म्हणून हा पत्र प्रपंच.

आपला,

**श्री. वा. जोशी**

संपादक 'दीपावली' यांस—

गेल्या दोन अंकांतला दीपावलीचा बदल जाणवला. धन्यवाद! संपादक, सूत्रधार आणि वाचक ही तुमची जाहिरात वाचून 'आवळ्याची मोट' बांधायचा तुमचा प्रयत्न किती यशस्वी ठरणार, याकडे माझं मत्सरी मन टक लावून पाहात आहे. जाहिरात करणें सोपें, पण त्यानुसार वागतात फार थोडे. एकंदरींत 'नवरंग' मासिक अशी किमया तुम्हीं करून दाखविणार म्हणतां? अहो तुम्हांला 'बाजारची' कल्पना आहे कां? अहो नीतीचे धडे द्यायचे हे दिवस आहेत का? 'मासिक बाजारांत' आज कुणाकुणाला भाव आहे याची तुम्हांला जाणीव नाहीं असें दिसतें. कृपा करून या सर्व गोष्टींचा विचार करावा!

आपला

**नं. भा. मुर्डेकर**

(सूचनांबद्दल धन्यवाद; पण तुमच्या मत्सरी मनाचें समाधान फक्त परमेश्वरच करूं शकेल. मानवाचें सामर्थ्य इथें तोकडें. —**संपादक**)

---

तर कधीं अकराव्या शतकांतली अर्धनारीनटेश्वराची गंगाजम्नी मूर्ति, कधीं 'अहिल्या' तर कधीं 'श्यामला' तर कधीं वारियाने हाललेले नुसतें कुंडल'!

एका विशिष्ट आणि अशिष्ट अनुभूतीसाठीं वेडापिसा झालेला असा लेखक मी पाहिला नाहीं.

'सह्याद्री' आणि 'गाथासप्तशती' नंतर या महान तपस्वी लेखकानें आणखीन कुठल्या साहित्यशिल्पाचा संकल्प सोडलेला होता हें त्या 'गोदावरी'सच माहीत!

**—रॉय किणीकर**

**"कृष्णा,' याची आठवण ठेव...!'**

दुःशासनाच्या रक्तानें भिजलेल्या हातांनी वेणी घालायची प्रतिज्ञा विसरूं नकोस!

भारतीय
कवि-कुल-भूषण :
११



माघ :

# कविता कामिनीचें पांडित्य

**क्षणे क्षणे यन्नवतामुपैति ।। तदेव रूपं रमणीयताया :।।**

तूं माझी गाउली । मी तुझें वासरूं ॥
नको पान्हा चोरूं । कृष्णा बाई ॥

अथवा

येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥ या ओळी कानावर पडतांच त्यांतील रम्य भावनेची आर्तता ज्याला प्रतीत होत नाहीं असा कोणी रसिक असूं शकेल काय ? त्यांना रसिक म्हणावें कीं न म्हणावें हा प्रश्न अलग ठेवला तर असेही महाभाग असतात. त्यांच्या दृष्टीनं ह्या भावगर्भ मधुर ओळी म्हणजे काव्य नव्हेच. काव्य कसें दणदणित हवें.

श्रीकण्ठेद्राद्यमरपरिषद्सेव्य गंगा प्रवाहीं । अथवा, वंशी नादनटी तिला कटितटीं ठेवोनि पोटीं पटीं । असें यांना कांहीं सांपडलें कीं हे आनंदानें बेहोष होऊन जातात. काव्य काव्य म्हणतात तें हेंच असें त्यांचें मत असतें. मोरोपंतांच्या काव्य सागरांतील,

देव तुझा कैवारी शुद्धें प्रेमें तुझ्याचि वळला गे ॥
दे धेनु दुग्ध धांवुनी वत्सा इतरां तदर्थ बळ लागे ॥ अशा अर्थानें ओथंबलेल्या रचना डावलून हे महाभाग,

अनलसमीहितसाधी रायावारा महीवरा कामा ॥

अनलसमी हितसाधी रायावारा महीवरा कामा ॥ अशीं शब्द-कोडीं घेऊन त्याच्याशीं कसरत करीत बसतात. अशा लोकांकडून काव्याच्या स्वरूपाबद्दल दिशाभूल होत जाऊन त्यामुळें शेवटीं काव्या-चेंच नुकसान होतें.

प्रत्येक भाषेच्या इतिहासांत घडणाऱ्या या गोष्टी संस्कृत भाषेच्या इतिहासांतही घडल्या. भारवीचें किरातार्जुनीय हें काव्य प्रसिद्ध झाल्यावर त्याच्या आस्वादकांत असे कांही पंडित निघाले कीं त्यानीं त्या काव्या-मागची प्रेरणा, त्याचा आशय याकडे दुर्लक्ष करून त्यांत दिसणाऱ्या पांडित्याचा उदोउदो चालविला. याचा परिणाम काव्याचा अपकर्ष आणि पांडित्याचा प्रकर्ष होण्यांत होऊन त्यांतून माघ या कवीचा उदय झाला. रघुवंश, कुमारसंभव, किरातार्जुनीय, शिशुपालवध आणि नैषधीय हीं जीं पांच संस्कृत महाकाव्यें, त्यांतील शिशुपालवधाचा माघ हा कर्ता होय. खुद्द शिशुपालवध काव्य आणि त्याचा जयघोष चालवि-णारे माघाचे भक्त यानीं ही गोष्ट सिद्ध केली आहे कीं शाब्दिक कसरती आणि पांडित्य याबाबतींत भारवीवर वरचढ होण्यापेक्षां दुसरी कोण-तीही प्रेरणा माघासमोर नव्हती. प्रत्यक्ष माघच मी हें काव्य पूर्वींच्या

अनुक्रमणिका

महाकवींची कीर्ति लुभाडण्यांच्या दुराशेनें लिहिलें अशी केबुली आपल्या काव्यांत देत आहे. त्याचे भाटही ' जोपर्यंत माघ मास आला नाहीं तोपर्यंतच रवीचे किरण ( रवि–भा ) प्रखर असतात. माघाचा उदय झाला की भारवी गळाठलाच ' असे उद्गार काढून हेंच सिद्ध करतात. माघ मासांतील थंडीच्या प्रभावानें भारवीसारख्यां माकडाचे पाय आंखडले असेंही या पंडितांनी म्हटलें आहे. कालिदासाच्या उपमा, भारवीचा अर्थगौरव इत्यादि गुणांचा समुदाय म्हणजे माघ हेंही वचन प्रख्यात आहे. असा आक्रोश चालू असतां या पंडितांना विसर पडला होता कीं कालिदासानें उपमांसाठीं, अथवा भारवीनें अर्थ गौरवासाठीं काव्यरचना केली नव्हती. तर त्यांनी अंतःप्रेरणेनें ही रचना केली असून त्यांत त्यांचें व्यक्तित्व शैलीच्या रूपानें प्रकट झालें होतें. केवळ सुपारी खाल्ल्यामुळें मनुष्य लोकमान्य होत नाही याचा जसा अनेकांना आज विसर पडतो तसाच माघ कवीला पडला. त्यामुळें पूर्व कवींच्या वृत्तांहून अधिक वृत्तें, पूर्व कवीच्या उपमाहून अधिक उपमा, अधिक श्लेष याचा वापर मी करणार अशा ईर्षेनें माघ रचनेस बसला. नायक व नायिका यांचाच शृंगार वर्णन करण्याची पूर्व कवींची प्रथा तर माघानें एक सबंध सैन्य आणि त्यांतील नायका यांचा शृंगार वर्णिला. प्रत्येक बाबतींत माझें अधिक ही प्रतिज्ञा त्यानें शेवटीं पुरी केली, आणि हिरेमाणकांच्या जडावानें डोळे दिपविणारी कृती तयार केली. कांहींकाळ साहित्यविश्व थक्क होऊन माघ म्हणजे कवि आणि कवि म्हणजे माघ असें समीकरण उत्पन्न झालें.

पण पंडितांचा गदारोळ संपून जेव्हां रसिक लोक या काव्याचा आस्वाद घेऊं लागले तेव्हां त्यांचा मेंदू हलला तरी हृदय डोलेना. नयन दिपले तरी ओलावेनात. चंदनाचा देव्हारा, सोनियांचे नंदादीप, हिरियांचीं पुष्पें, पाचूचे दुर्वांकुर याचा सारा झगमगाट आहे खरा पण ती देवमूर्ति कुठें आहे हेंच त्यांनादिसेना. साधी तुळशीची मंजिरी भक्तिभावांनें विनम्र होऊन देवावर वहातांना जे भावतरंग उठतात ते या अलोट वैभवाच्या आतषबाजींत उठेनात.

दुर्योधनाच्या वैभवानें मन क्षणभर बावचळलें तरी भारतीय मनाला शेवटीं विदुराच्या कण्याच रुचावयाच्या. शेवटीं अभ्यासकांनीं भारवी आणि माघ यांचें काव्य अंशाअंशानी अभ्यासून भारवीशीं चढाओढ हीच माघाची प्रेरणा हें समप्रमाणांत सिद्ध केलें. भारवीला झांकळून टाकलें असा डौल मिरविणारा माघ हळूहळू मागें पडत कविमालिकेंत आपल्या योग्य स्थानावर येऊन बसला. महाकवि व्हावयास आवश्यक अशा अनेक गुणांनीं संपन्न असूनही केवळ प्रेरणा चुकली यामुळें माघाचीं अशी अवस्था झाली.

याचा अर्थ शिशुपालवध काव्य त्याज्य आहे असा मुळींच नाहीं. पानोपानीं तें रम्यतेनें खचून भरलेलें आहे. जी क्षणोक्षणीं नवा प्रत्यय आणून देते तीच रमणीयता या माघाच्याच व्याख्येप्रमाणें तें काव्य जिवंत नसलें तरी रमणीय खासच आहे. पुढील काहीं रम्य कल्पना पहा.

(१) मयसभेची फरसबंदी पाचूची होती. तीवर प्रकाश पडला कीं हिरवेगार किरण बाहेर पडत. ते जणूं दूर्वांकुर आहेत अशा कल्पनेनें हरिणबालकें ते खावयास धांवत-

(२) यादवांनी रतिक्रीडा सुरू केल्यावर त्यां पाहाण्याची लाज वाटल्यानें रजनीनें आपलें चंद्रमुख क्षितिजाआड लपविलें.

(३) सूर्याचें किरणरूपी धन संपल्यावर पश्चिमदिशारूपी वेश्येनें त्याला लाथ मारून महालांतून बाहेर घालविलें.

हें आणखी एक वर्णन पहा. आपली झोपावयाची वेळ झाल्यावर पहिल्या पहारेकऱ्यानें निजलेल्या दुसऱ्या पहारेकऱ्यास हालवून ' उठलास कारे ' असें विचारलें. तो ' हा उठलोंच ' म्हणुन लगेच झोंपीं गेला. कृष्णनिंदा करतांना शिशुपाल म्हणतो, ' नीचा तुझी गुणहीनाची पूजा करणें म्हणजे तुळतुळित टकलावर फणी फिरविणें होय ' असो.

माघाचें सर्वश्रेष्ठ वैशिष्ट्य म्हणजे त्यानें आपल्या काव्यामधें अपरंपार शब्दसंपत्तीचा आणि शक्य त्या सर्व व्याकरण प्रयोगांचा उपयोग केला आहे. माघाचे नुसते नऊच सर्ग वाचले तर संस्कृत भाषेंत नवा शब्द शिल्लक रहात नाहीं असें सुभाषित आहे. म्हणून माघ हा कविताकामिनीचें पांडित्य होय.

असा हा पंडित माघ गुजराथमध्यें सातव्या शतकांत होऊन गेला. श्रीवर्मल या गुजराथच्या राजाचा सर्वाधिकारी सुप्रभदेव याचा माघ हा नातू. दत्तक हे याच्या वडिलांचें नांव. आजोबा, पिता आणि पुत्र हे तिघेही मोठे उदार दाते होते.

माघाबद्दलची दंतकथा आहेच. एका दंतकथेप्रमाणें तो धारचा राजा भोज याच्या वैभवास नाकें मुरडून आपल्या घरीं परतला. राजवैभवास हंसणाऱ्याचें वैभव पाहूं तरी म्हणून भोजानें त्याला भेट दिली. तेव्हां काय विचारावें ? राजाचें सारें सैन्य याच्या उत्तुंग सुवर्णमंदिरांत मावलें. तेथें सोन्याच्या फरशा, पाचूचे खांब, चंद्रकांत मण्याच्या बिछा-

...पान ५८ वर

**शाबासकी......!**




'तुमची मोटर सायकल भारीच ' फास्ट ' बुवा ! अहो, आधींचे कित्येक पोलीस आम्हांला गाठूं शकले नाहींत !'

# पेळू

—भी. गो. जांभळे

*निष्पाप माणसांतली ही निष्पाप कथा. जीवन सांगणारी आणि जिवाला हुरहुर लावणारी. कागदाचे कपटे जमिनीवर आपटले असतां जमीन दुभंगते—असल्या कल्पनांचे डोंगर मनापुढें उभे राहिल्यानंतर जीव हरखतो. आणि...*

म्हाद्यानं म्हसरं घराच्या दरवाजांतनं बाहेर काढलीं. तीं गुमान रानच्या वाटेला लागलीं आणि म्हाद्या गुरांच्या मागुमाग लंगटीचा लांबडा शेव ओढून बाहेर पडला. भाकर बांधलेलं चिरगुट डोक्यावर बराबर ठिऊन तोंडांत बोटं घालून त्यानं एक उगाच कर्कश शीळ घातली. गुरं नीट रस्त्याला लागलीं. ओढाळपणा न करतां तीं नीट जातील अशी त्याला खात्री पटली नि तो सद्याच्या घराकडं वळला. म्हाद्यानं सद्याला हाळी घातली, 'सद्या, मी निगालों रं रानला. गुरं फुडं झाल्याती. येतुयास काय ?'

सद्याला म्हाद्याची हाळी ऐकूं आली. भाईर येऊन तो म्हाद्याला म्हणाला, 'हो तूं फुडं, जरा येळ हाय र !'

'कां र ?'

'आजून शेण–गोठा व्हायचा हाय–येळच जाला !'

'बरं हाय ! व्हतो मी फुडं, ये तूं आवरून-घ्यान लौकर.'

—आणि म्हाद्यानं किशीच्या घरांपुढं उभं राहून तिला हाक मारली. किशी हाक ऐकून

बाहेर आली. तिचे हात शेणानं बरबटलेले होते. परकराचे ओचे खोचलेले, अंगांतलं पोलकं कसंतरीच, भुरकटलेल्या केसाच्या बटा कपाळा-वर आलेल्या. शेणाच्या हातांनीं केसांच्या बटा तिला सावरतां येईनात. तिनं त्या खांद्यांनीं बाजूला सारण्याचा निष्फळ प्रयत्न केला.

'चल की ग, किती येळ ! बग, झाडाच्या सावल्या किती लांब पडल्याती.–' त्याचं आपल्या सावलीकडं लक्ष गेलं. लंगुटीच्या शेपटीची लांब पडलेली सावली पाहून त्याला मनांन गंमत वाटली !

'थांबतुस का वाईच, भाकरी–कोरड्यास व्हायचं हाय अजून. झालं की जाऊं आपून–'

'व्हायचं हाय अजून ?–गुरं लई लांब ग्येली ग, कुटंतरी वावरांत शिरत्याल–' तो तिच्या-कडं उगाच बघत राहिला-

'मग व्ह तूं फुडं, आलेच मागुमाग तुज्या.'

'हां, बिगी ये—मी वाट बगतु वड्यावर, नाय तर गंगा माळणीच्या शेताच्या बांदावर.–'

'हां !'

म्हाद्या ओढ्यावर आला तेव्हां गुरं संथपणं पाणी पीत होतीं. इकडं तिकडं पांगलीं होतीं. त्यानं तीं सारीं एक जागीं वळवलीं. नाजूक शीळ घालून साऱ्यांना त्यानं पोटभर पाणी पाजलं. मग गुरं ओढ्याकांठच्या झाडांच्या सावलींत शिरलीं. म्हाद्या तिथंच एका झाडाला टेकून बसला.

—सद्या किशीची वाट बघत.

× × ×

हाताच्या चुंबळीवर म्हाद्यानं हनवटः टेकली होती. वाटेकडं डोळे लावून पहात होता. मधून मधून इकडं तिकडं आकाशांत उगाच पहात होता. उंच उंच आकाशांत घारी घिरट्या घालत होत्या. मधूनच चिम-ण्यांचा थवा चिंव चिंव करत इकडून तिकडं भुरं भुरं जात होता. टेकलेल्या झाडाच्या एका फांदीवर साळुंकीचं एक जोडपं 'मंजुळ वाणी' बोलत होतं. शेजारच्या आंब्याच्या झाडावर खारोट्या पाठशिवणीचा खेळ खेळत होत्या. ओढ्यांतल्या झुळझुळ वाहणाऱ्या उथळ पाण्यांत पसरट दगडांवर कांहीं बाया धुणी धूत होत्या. कुठं प्रवाहांत एका कावळ्याचं स्नान चाललं होतं. ओढ्याचं पात्रच मोठं. उन्हाळ्यामुळं पाणी कमी. झुळझुळ वहाणारा रेघोटीसारखा पाट सोडला तर सारं पात्र कोरडंच. ओढ्यांतून पल्याडच्या एका खेड्याला रस्ता जात होता. एकाकीच. दुर्मुखलेला. सोबत नसल्यासारखा. दुतर्फा झाडें असूनहि त्यानं त्यांची सोबत घेतली नाहीं. अलिप्तपणानं त्यांच्याकडं पहात होता, त्यांच्याशीं वागत होता !

हें सारं आणखीन किती तरी पाहण्यांत म्हाद्याचा किती वेळ गेला कुणास ठाऊक !– एकाएकीं त्याला एकाकी वाटायला लागलं. कंटाळला. गुरं वळवायच्या काटीचा रेटा देऊन तो उठला. गुरं हाकारलीं. सद्या नि किशी यायच्या रस्त्याला नजर दिली.

'अजून सद्या किशी कां आली न्हाईत कुना दकल–' असं म्हणून तो गंगा माळणीच्या शेताच्या दिशेनं जायला निघाला. 'बांदावर वाट बगत न्हातो' असं त्यानं सांगितलेलं होतं, तें त्याला आठवलं.

गुरं रेंगाळत जात होतीं. म्हाद्याला असं एकाकी जाऊन कधीं माहीत नव्हतं. सद्या नि किशी संगं असायचींच. हंसत-खेळत, टप्पं करत करत आपल्या शेत-मळ्यापर्यंत जायचीं. वाटेंत कवा गुरं उभीं करायचीं, खेळ मांडायचा. विटी–दांडू, व्हट्टा–गुट्टी नि गोट्यांचा. या खेळांत म्हाद्या मागं पडायचा. किशी सरसरून खेळायची. म्हाद्या–सद्याला जितायची.—मळ्यांत पोचल्या-वर विहिरींत उतरायची. पाण्यांतले खेळ चालायचे. मोटवणावरनं धडाधड उड्या पडायच्या. पाण्यांतल्या खेळांत मात्र म्हाद्या सद्याला नि किशीला हरवायचा.—पण या हार–जितीचं त्यांना कांहींच कधींहि वाटलं नाहीं. हार–जितीची कल्पनाच त्यांच्या मनाला कधीं शिवली नव्हती.

सद्या नि किशी येईसतोवर वाट बघत बसा-यचं म्हाद्यानं मनाशीं ठरवलं आणि तो गंगा माळणीच्या शेताच्या रस्त्यालगतच्या बांधावर बसला. शेतांत कुंई कुंई मोट चालली होती. रस्त्यावरनं शेतांकडं बैलगाड्या खड-खडत चालल्या होत्या. त्यांचा आवाज त्याला ऐकू आला नाहीं. पाटांतनं वाहत असलेलं देखणं पाणीहि त्याला दिसलं नाहीं. इतका विलक्षण एकाकीपणा त्याला नकळत जाणवत होता. शेताच्या वाटेवर गंगाच्या शेतांत त्यांचा मुक्काम पडायचा तेव्हां विटी–दांडू नि गोट्यांचा खेळ चालायचा. त्यासाटीं पाडलेल्या गद्या त्याला दिसल्या. त्या मोठ्या मोठ्या होऊन आपल्या डोळ्यांत शिरत असल्या-सारख्या त्याला वाटल्या. छातींत घालमेल झाल्यासारखंहि त्याला झालं.

गुरं शेताच्या रस्त्याला लागलीं होतीं. वरा-पासनं गंगा माळणीचं शेत जेवढं लांब तित-कंच तिथनं त्याचं शेत लांब. गुरं तिथें

...पान २३ वर

–'युद्ध' तहकुबी–



'आपला समेट बरं का ! जेवतांना तुम्हीं बोलायचं अन उरलेल्या वेळांत मी–!!'



*आपल्या थोर पित्याच्या स्मृतीस कन्येनें वाहिलेली ही हृद्य श्रद्धांजली—*

# असे होते आमचे भाऊसाहेब—

जानेवारींत शांताबाईंची फैजाबादहून तीन चार पत्रें आलीं. लखनौला जाऊन नातवाला पाहून आल्याचें, बारशाची तारीख ठरल्याचें, पुण्याला येत असल्याबद्दलचें...आणि पाठोपाठ भाऊसाहेबांना पुनः ॲटॅक आल्याचें. त्यानंतर तीन चार दिवस झाले तरी कांहीं पत्र आलें नाहीं. मी फार अस्वथ झालें. रोज पोस्टमनची वाट पाहून निराश होत होतें. मंगळवारीं रात्रीं तारवाला दाराशीं आला आणि छातींत धस्स् झालें.

भाऊसाहेब आम्हांला सोडून गेले होते. विश्वास बसत नव्हता, पण तार स्पष्ट होती. मंगळवारीं सकाळीं......फार मोठा आघात आमच्यावर झाला होता. पण अशा वेळीं कसें वागायचें असतें, त्याचें उदाहरण त्यांनीच घालून दिलें होतें.

५७ सालीं अज्ञानकपणें आमचा माधव वारला. तार आली आणि तावडतोब मी पुण्याला गेलें. भाऊसाहेब गॅलरींत उभे होते. मी आल्याचें त्यांनी पाहिलें आणि त्या तशा स्थितींत स्वतःचें दुःख आंतल्या आंत दाबून टाकीत दोन जिने उतरून ते खालीं आले, माझें सांत्वन करायला. आंतल्या आंत ते रडत होते पण तसं न दाखवतां माझी समजूत घालीत होते.

पुढें वरकरणीं भाऊसाहेब हंसत होते. पण माधवचा फटका त्यांच्या जिव्हारीं लागला होता. कुणापुढेहि न वांकणारे भाऊसाहेब ह्या दुःखानें कणा गेल्यासारखे वाटले. दहा वर्षांनीं म्हातारे दिसूं लागले.

शुक्रवारांतल्या आमच्या ज्या घरांत माधव लहानाचा मोठा झाला आणि हातातोंडाशीं येऊन गेला त्या घराच्या आठवणीसुद्धां नकोत म्हणून घर बदलायचें ठरलें. आम्हीं डेक्कन जिमखान्यावर रहायला आलों. पण जिमखान्यावरच्या घरांत भाऊसाहेब रमले नाहींत. आयुष्यांतला सगळा उमेदीचा काळ शुक्रवारांतल्या घरांत गेला होता.

एकेक करीत त्यांनीं पुस्तकें जमवलीं होतीं, तीं याच घरांत. घराचे दोन मजले पुस्तकांनी भरले होते आणि तरीहि रोज कुठून कुठून आणखी नवीन पुस्तकें भाऊसाहेब घेऊन येत होते. कोर्टांतून किंवा कुठून बाहेरून येतांना त्यांनी कधीं पुस्तकें आणलीं नाहींत असें झालें नाहीं. रद्दीवाल्याकडे ते तासचे तास बसत आणि दुर्मिळ पुस्तकें शोधून काढीत. दुर्मिळ पण फाटकीं तुटकीं पुस्तकें घरीं आल्यावर ते नीट शिवून बाईंड करीत. पुस्तकें जमविण्याचा भाऊसाहेबांना छंद होता असें म्हणण्यापेक्षां

...पान २९ वर

सौ. मंगला बर्वे, बी.ए.



# योग्य मेट्रिक परिमाणांत खरेदीविक्री करा

बहुधा जुन्या वजनांचे मेट्रिक वजनामध्ये सरळ रुपांतर करून वस्तु मागितल्या जातात. उदाहरणार्थ पावशेराकरिता २३३ ग्राम मागितले जातात, तसेच १ रतलाकरिता ४५४ ग्राम मागितले जातात. अशा तऱ्हेने वस्तु मागणे हे दशमान पद्धतीच्या तत्त्वानुसार नाही. शिवाय यामुळे जुन्या पद्धतीप्रमाणेच मापणांत किचकट हिशोब करावा लागतो. परंतु दशमान पद्धतीचा एक मुख्य हेतु अशा तऱ्हेची क्लिष्ट आंकडेमोड दूर करणें हा आहे.

वरील उदाहरणांत वस्तु मागण्याची योग्य पद्धत म्हणजे २०० ग्राम, ३०० ग्राम, ४०० ग्राम अगर ५०० ग्राम मागणें

| पूर्वी या मापानें घेत असाल | तर आतां मागा |
|---|---|
| १ औंस (= २८ ग्राम) | ३० ग्राम |
| १ पौंड (= ४५४ ग्राम) | ५०० ग्राम |
| २ पौंड (= ९०७ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| ७ पौंड (= ३.१७ किलोग्राम) | ३ किलोग्राम |
| १४ पौंड वा स्टोन (= ६.३५ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| २८ पौंड (= १२.७० किलोग्राम) | १० किलोग्राम |
| ५६ पौंड (= २५.४० किलोग्राम) | २० किलोग्राम |
| ११२ पौंड वा हंड्रेडवेट (= ५१ किलोग्राम) | ५० किलोग्राम |
| १ टन (= १०१६ किलोग्राम) | १००० किलोग्राम |
| | |
| १ तोळा (= ११.६६ ग्राम) | १० ग्राम |
| १/१६ शेर वा छटाक (= ५८ ग्राम) | ५० ग्राम |
| १/४ शेर वा पाव (= २३३ ग्राम) | २०० ग्राम |
| १/२ शेर (= ४६७ ग्राम) | ५०० ग्राम |
| १ शेर (= ९३३ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| २.१/२ शेर (= २.३३ किलोग्राम) | २ किलोग्राम |
| ५ शेर (= ४.६६ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| १० शेर (= ९.३३ किलोग्राम) | १० किलोग्राम |
| २० शेर (= १८.६६ किलोग्राम) | २० किलोग्राम |
| १ मण (= ३७ किलोग्राम) | ३० किलोग्राम |
| २.१/२ मण (= ९३ किलोग्राम) | १ क्विंटल (१०० किलोग्राम) |



**योग्य रीतीनें मेट्रिक पद्धतीचा अवलंब करा**

**प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई**

सामर्थ्य आहे लिहिण्याचें—
जो जो करील तयाचें,
परंतु तेथें दिडक्यांचें। अधिष्ठान पाहिजे.
लिहिल्यानें होत आहे रे। प्रसिद्ध
आधी लिहिलेंचि पाहिजे। व्हा सिद्ध।

(संतकवि कै. एन्. एस्. टोसर,
ॲलिअस रामदास
यांना क्षमा करून.)

# मी मासिक काढतों

—पद्माकर गोवईकर



माझ्या 'पुष्पांसि जीर्णानि यथा हुंगाय...' या पहिल्या कथेंमागचें सूत्र अथवा पार्श्वभूमि ही होती. माझी ही पहिली 'वस्तू'-(श्री. अण्णा दांडेकर हयात असल्या-मुळें त्यांची क्षमा मागून) 'खऱ्या गोष्टी' मासिकांत जेंव्हां छापून आली तेंव्हां तिच्यावर बऱ्याच मोठ्या लेखकांची छाप पडली आहे, असें बरेच लोक म्हणाले. इतकेंच काय, पण त्यांतल्या ओळीच्या ओळी गडकऱ्यांनी लिहिल्यासारख्या वाटतात असें जेव्हां आमचे अकौंटन्ट म्हणाले, तेव्हां मात्र मी चाट पडायचें विसरूनच गेलो. असला 'हिशेब' ते टेवीत असतील याची मला कल्पना नव्हती. त्यांनी गडकरी वाचलेला पाहून मी अतिशय गहिंवरून त्यांना विचारलें, 'तुम्ही समग्र गडकरी वाचला आहे वाटतं!'

त्यावर ते अपराधी चेहरा करून म्हणाले,

'मी नाहीं वाचला, पण असें आपलें धुमाळ म्हणत होते...'

मी धुमाळांकडे गेलो. तोच प्रश्न त्याच स्वरांत मी त्यांना विचारला. त्यांना वाटलं माझ्यावर केलेल्या टीकेचा जाब मागायला मी आलोंय. एकदम वस्सकन् ते माझ्यावर ओरडले,

'...मी समग्र गडकरी वाचीन नाहीं तर फाडीन. तुमच्या तीर्थरूपांच्या जी. पी. फंडांत कांहीं कमी पडत नाहींत, ना? निदान तुमच्यासारखा समग्र गडकरी मी रीराइट् तरी करीत नाहीं...'

माझे वडील त्यांचे बहुतेक ड्राफ्टस् री-राईटसाठीं परत करीत असल्यानें त्यांचा माझ्या वडिलांवर आणि कुठलीहि गोष्ट 'री' करण्यावर राग होता.

जातां जातां पुन्हा ते ओरडले,

'दिवसामाजीं कांहीतरी लिहावें, या समर्थोक्तीचा असा गैरफायदा घेण्यांत काय अर्थ आहे...?'

या सगळ्याकडे लक्ष देण्याइतका मी कांही अगदींच 'हा' (इथें मान 'कसा ग गडे, झाला...' म्हणतांना जशीं होईल तशी करावी...) नव्हतों. मला स्वतःला लिहिण्याची अदम्य इच्छा होती आणि त्यासाठीं लागणारे दिडक्यांचें अधिष्टानही होतें. संपादकांना पंचवीस पंचवीस रुपये देऊन गोष्टी छापून येऊं लागल्या तर त्यांत फारसें काय बिघडलें! परंतु लवकरच पुढें आमचें हेंहि सुख सरस्वतीला पाहवलें नाहीं—(त्याला कारण माझ्या जवळची लक्ष्मी, असे मला कालच कळलें. दोन तरवारीं एकत्र नांदत नाहींत हेंच खरे!) संपादकांनी दर वाढवला आणि माझ्याकडून रुपये ७५।- प्रत्येक कथेला मिळाल्याखेरीज माझी कथा प्रसिद्ध होईनाशी झाली... म्हणून केवळ स्वतःची लिहिण्याची इच्छा पुरी व्हावी यासाठीं मी स्वतःच मासिक काढायचें टरवलें. त्याला आणखीहि दोन कारणें झालीं.

इंटरला बऱ्याच प्रयत्नानंतर युनिव्हर्सिटी कडून, 'तुमची कॅंडिडे-टशीप रद्द केली आहे...' असें मला लिहून आलें. केवळ म्हणून मला तो नाद सोडावा लागला नाहीं तर मी अदम्य होतो. चालणारा दमतोय् कां वाट दमतीय् या ईर्ष्येनें मी परीक्षेला बसत होतो. वास्तविक एक्झॅम फीज् माझ्याइतकी वेळेवर आणि दर सहा महिन्यांनीं भरणारा

एक आजीव भिडू भेटला असतांना युनिव्हर्सिटीनें अशी नोटीस देणें कितपत योग्य होतें ? सरकारला एकूण उत्पन्नापैकीं निम्मे कर उत्पन्न राजकपूरच्याच चित्रपटानें दिल्यामुळें त्याला एकट्यालाच परदेशी चलन देऊन रोमला धाडलें, तसें मी रोम रोम जळून सातत्यानें पैसे भरत असतांना युनिव्हर्सिटीनें मला निदान परीक्षेला बसूं देण्याचें कन्सेशन द्यायला नको होतें–कां ? तसा मीं अर्जहि केला. परंतु ' कृपा करून ती गळ घालूं नका ' अशी युनिव्हर्सिटानेंच मला उलट विनंति केली. याचें कारण मला पुढें समजलें, कीं न्या. रानड्यांच्या एम्. ए. च्या उत्तर–पत्रिका त्यावेळच्या गुणज्ञ परीक्षकांनी केंब्रिजला पाटवल्या तशा माझ्या इंटरच्या ' तिसऱ्या खेपेच्या 'च्या उत्तर–पत्रिका पुणें युनिव्हर्सिटीला वेगळ्या अर्थानें केंब्रिजला पाठवाव्या लागल्या होत्या. आणि इतका हुशार विद्यार्थी तिकडेच असलेला बरा असें ठरवून युनिव्हर्सिटीनें माझी कॅंडिडेटशीप रद्द केली होती. मीहि लग्न झालें नाहीं तरी लग्नाच्या मांडवाखालून जायला मिळाल्याचें समाधान प्राप्त करून घेऊन पुन्हां परीक्षकांच्या वाटेस गेलो नाहीं...

कॉलेज सुटलं ! मासिक निघण्याचें एक कारण...

एकीकडे मी परीक्षेला चिन्यांसारख्या धडका देत असतांनाच दुसरीकडे नोकरीहि करत होतों. तीर्थरूप डेप्युटी कलेक्टर असल्यानें त्यांनीच मला चिकटवून घेतलें होतें त्यांच्या पंचवीस–तीस वर्षांच्या सरकारी सेवेच्या काळांत त्यांनी आपले असंख्य पोक पुरे करूनहि (मला माहित आहे, मराठवाड्यांतल्या एका बाईला त्यांनी बंगला बांधून दिलाय तें) जी. पी. फंडाची रक्कम दहा–बारा हजारापर्यंत नेली होती. शिवाय बोकड कमाई वेगळीच होती. ह्याचें पेन्शनचें काम कर, त्याची बदली कॅन्सल कर असले हजारो उद्योग करून त्यांनीं माझ्या एकट्याच्या नांवावरची रक्कम पंचवीस हजाराच्या घरांत नेली होती. त्यांच्या सर्व्हिसबुकावर तीळ असल्यामुळें रिटायर्ड होऊनहि त्यांनीं पुढें दोन वर्षें Extend करून घेण्यांत यश मिळवलें होतें. ते रिटायर्ड झाल्यावर त्यांच्यावर खार खाऊन असलेल्या अनेक लोकांनीं मला पुढें ऑफिशियल त्रास द्यायला सुरुवात केली. ' वडिलांचा काळ गेला म्हणावें आतां...' ' स्वतंत्र ड्राफ्टिंग केव्हां येणार ? ' ' इंटरच्या मानानें फारच कच्चें आहे बुवा, तुमचं इंग्लिश...' ' त्याला डिस्पॅचला बसवा...' अशीं कुणकुण माझ्या विषयांत ऐकूं येऊं लागली. कानडी ऑफिसर तर आपल्या कारवारी भाषेंत माझ्या डोळ्या-देखतां एकमेकांत मला शिव्या घालत. मांझ्या भाषिक अज्ञानांत मी सुखी होतों. मला कांहीं कळायचं नाहीं. मी तोंडावर सर्वोदयी हंसू ठेवत होतो. त्यामुळें त्यांची जास्तच करमणूक होत होती. ' शिव्या खाऊनहि हंसतोय लेकाचा...' या भावनेनें माझ्याकडे ते पाहत...

ऑफिसमध्यें अशी रोज कन्नाकन्नी उठूं लागली तशी पंचवीस हजारावर नुसता

'अति' चाणाक्ष—




अनेक वर्षांच्या बाजारहाटीच्या अनुभवानें मराठी वाचकांसाठीं चाणाक्षपणानें केलेलें मासिक रसायन—

कांहीं मदन मस्त कथा, त्यांत विनोदात्मक लघुनिबंध घालून मग एका कादंबरीचीं कांहीं पानें त्यांत मिसळावीं.......

सुपर टॅक्स भरण्यापेक्षा स्वतंत्र उद्योग करावा असा विचार करून मी नोकरीचा त्याग केला.

तात्पर्य, कॉलेजहि सुटलें आणि नोकरीहि सुटली !

स्वतंत्र उद्योग म्हणून मराठींत एक आदर्श मासिक काढायचें ठरवून मी 'सल्ला हवा' असा घरावर बोर्ड लावला. लागत लागत जाती तशी ही वार्ता पसरत गेली आणि बहुतेक आठ दिवसांत आमच्या कुटुंबावर कौटुंबिक आपत्ति कोसळणार अशा समजुतीनें आणि चेहऱ्यानें निकटवर्ति एका रविवारी मला भेटायला आले. त्यांत रघू साठेहि ' मला आतां रघू म्हणणारें कोणी नाहीं' असें व्याख्यान द्यायच्या थाटांत आलेला मी जेव्हां पाहिला तेव्हां मीही गडबडीनें ('तुला रघू नाहीं रघ्याच म्हणणार' अशा थाटांत) उठलों आणि अत्यंत केविलवाण्या स्वरांत, ' कांहीं नाहीं मी मासिक काढणार आहे.' एवढें म्हटल्याबरोबर खोलींतली सर्व मंडळी हात जोडून पौराणिक चित्रपटांतील प्रसन्न झालेल्या विष्णूपुढें उभ्या राहिलेल्या भक्तांसारखी उभी राहिली आणि कोरसांत अक्षरशः ओरडली,

'आमच्या हातून कांहीं चूक झाली कां ? ही शिक्षा आम्हांला कां ?'

मॉर्नींग शो सुटावा तसें भराभर आमच्या घरांतून सगळे बाहेर पडले. ते बाहेर पडत असतांना कांहीं उद्‌गार माझ्या कानीं आले,

' तसा प्रकृतीनें बरा आहे, हो ! थोडडडा मेंटल झालेला दिसतोय्...'

' वडिलांनीं पै पै करून सांठवलं आणि हे दिवटे निघाले... '

' असं कांहीं करील असं नव्हतं वाटलं बाई ! '

' मला वाटतं कुणीतरी त्याच्यावर देव केलाय् ! '

' खुळ्काय च्यायला माणसं असतात...इतका पैसा माझ्या नांवावर हवा होता...'

असं म्हणत सगळे ' चालून राहिले. '

त्यापैकीं धाडस करून खोलींत थांबलेल्या त्या क्षेत्रांतील कांहीं जाणत्या मंडळींना ' वाटीभर ताक ' मागितल्यासारखा मी सल्ला मागितल्यावर, त्या ताकाइतकें आंबट तोंड करून सगळ्यांनीं मला ' नॉनसेन्स ' ठरवलें आणि सल्ल्याच्या व्हरायटीज् ऐकवल्या.

' कोळशाची वखार काढा...' एक सल्ला.

' छे, हो ! कोळशांत पैसा घालून काळें तोंड करून घेऊं नका. तुम्ही ' डेरी ' घाला दुधाची...' दुसरी सूचना.

' तुम्हाला सांगूं कां, तुम्ही एक माझ्याकडे आलांत म्हणून सांगतो,–'(वास्तविक तोच माझ्याकडे आला होता) आपल्या गावांत इतकीं हॉटेलं आहेत, एकांत तरी दहीपोहे मिळतात कां ? माझं मत विचाराल तर, तुम्ही नुसतं दही पोह्याचं हॉटेल घाला: दहीपोहेच, दहीपोहे......'

" गायतोंडे,—" 'शंख' मासिकाचे





अनुक्रमणिका

संपादक हजरनवीस ओरडले. "त्यापेक्षां तुम्ही दहा हजार रुपयांची अफूची बोंड कां खात नाहीं ?'

'मला अफू खायलाहि पैसा नाहीं म्हणून मी मासिक काढत नाहीं !' मला तोंड उघडायला प्रथमच संधि दिल्याबद्दल मनांतल्या मनांत त्यांचे आभार मानून, मी एक सबंध वाक्य बोलला.

'पण नंतर अफू खायलाहि पैसा राहायचा नाही. पैसा आहे–तोंवर अफू खाऊन घ्या... '

'म्हणजे ? ' मी दचकलों.

'म्हणजे काय, डोक्यावरचें केंस काढण्याइतकें मासिक काढणें सोपें नाही. '

'डोक्यावरचे केंस काढणें सोपें आहे म्हणतां ? '

'मासिक काढण्यापेक्षां निश्चित. मासिक काढलंत तर तेहि राहायचे नाहींत...'

'असं ? मग दहा हजार रुपयांचीं सल्नस् किती निघतील ?'

'वास्तविक यानंतर त्यांनी 'मला सल्ला सांगता येत नाहीं ' असें म्हणायचें होतें. भूत पाहिल्यासारखें पळून जायचें काय कारण होते ?'

त्यानंतर आमचें हेडक्लार्क रस्त्यांत भेटले. कलिंगडाच्या फाकीइतकें लांब हास्य करून म्हणाले,

'काय गायतोंडे, तुम्ही कांहीं मासिक–बिसिक काढतांय म्हणे ' ('इन्क्रिमेंटस् मिळाली वाटतं !' हा पुढचा प्रश्न त्यांच्या ओठावर तरळतांना चक्क मला दिसला. पण मी नोकरींतून बाहेर पडलोंय हें त्यांच्या लक्षांत आले असावें) 'कशाला इतक्यांत काढतांय ! अष्टग्रहीचा पिरिअड आहे. आत्तां कांही काढायचं नाहीं आपण ! ' असं आपुलकीनें सांगून शेवटीं महिना अखेर असल्यामुळें माझ्याकडून पांच रुपये उसने घेऊन जातां जातां पुन्हां कलिंगडी हास्य करून ते म्हणाले, 'ह्यॅः ह्यॅः ह्यॅः गायतोंडे, तुमच्या मासिकाचा कॉंप्लिमेंटरी अंक आला पाहिजे हं, आपल्याला ! '

'कांही काढायचं नाहीं, कांही काढायचं नाहीं' असं म्हणत त्यांनीं मात्र माझ्याकडून पांच रुपये काढले आणि अष्टग्रही आली याचें सफाईदार प्रत्यंतर तत्परतेनें दिलें.

पुढच्याच वळणावर आमचे संस्कृतचे प्रोफेसर भेटले. त्यांनीं तर कहरच केला. आधीच त्यांचा माझ्यावर डोळा होता. कॉलेजमध्यें असतांना माझें संस्कृतचें ज्ञान पाहून त्यांनीं तोंडांत बिशी बोटें घातलीं होतीं 'इतकें असंस्कृत असाल असें वाटलं नव्हतं,' अशी त्यांनी कोटी केली होती. त्यावेळी इतर मुलांबरोबर अनवधानानें मीहि हंसलो. त्यावर ते फारच चिडले होते. 'एतद् मया न सह्न्ते ' असं देववाणींत गर्जून त्यांनी गम-गच्छति या क्रियापदाचा अर्थ (वर्गाबाहेर) 'जाणे ' असा मला समजावून दिला होता. ते फार दिवसांनीं रस्त्यांत भेटले. मासिकाची वार्ता त्यांना कळली होती. अतिशय कुत्सित हंसत त्यांनी विचारलं,

'काय गायतोंडें, आतां बरं वाटतय् ना ! '

आणि त्यावेळीं डोक्यावरून गेलेल्या राजशेखरच्या श्लोकांसारखे ते झर्दिशी निघून गेले.

या कोणाचीहि गय न करतां मी एके दिवशीं घरांतच एका खोलींत टेबल-खुर्ची मांडली. भिंतीवर कुलस्वामिनी खंडोबाचें छायाचित्र लावलें. आणि मासिकाचें कार्यालय थाटलें...

**'गाढा ' संपादक !**



मराठी वाचकाला नेमकें काय हवें याचा पत्ता चाणाक्ष संपादकांनासुद्धां लागला नाहीं––तो फक्त यांना लागला.

महाराष्ट्रांत नामांकित पत्रकार आहेत याची 'मासिकाला नांवें सुचवा ' अशी अखबरांत जाहिरात देईपर्यंत मला कल्पना नव्हती. एका पत्रलखिकेनं कळवलें होते, (पत्रें मुळाबरहुकूम दिल्यानें ओळीओळी पाणिनीचा उद्धार करण्यांत आला आहे. आतां ती गोष्ट माझ्या हाताबाहेर गेली आहे. )

'स. न.

तुमची मासीकाचि बातमि वाचली. आणि त्याप्रमाणें मी नांव सूचवित आहे. हल्ली 'देवांगना' 'रती' वगैरे बायकांची बायकांची नांवें दिलेली मासिकं फारच आहेत. आतां ती बदलण्यांत पुरुषार्थ नाही कां ? तरी तुम्ही मासिकाला 'दशरथ ' किंवा 'कण्व ' यापैकी नांव ठेवावे. आणि माझी बक्षीसाची रक्कम खालील पत्त्यावर पाठवावी—

आपली नम्र
कु. गंगामाता पितळे '

दुसऱ्या एका भिडूनें त्याच पद्धतीवर नांव सुचवतांना लिहिलें होते—,

'प्रिय महाशय,

'मस्ती ' 'रती ' यांच्या जोडीला तूमची 'ऊरवशी ' येऊं द्या. ऊरवशी नांव ठेऊन या पुरुरव्याला कृतार्थ करावें. बक्षीस लगेच पाठवावें—

आपला,
माष्टर दिनू खाडे '

एका बाईनी तर कहरच केला होता.

'—खरं सांगू कां ? तुमचें नांव पोपट असल्यामुळें तुम्हि मासिकाला 'मयूना ' नांव द्या. आहे पसंत ?

तुमची–
सौ. कल्पकता लिखिते '

पत्रांच्या त्या गठ्ठयांत दोन रद्दीवाल्यांचीहि अभिनंदनाचीं पत्रें

वाचली तशी तोंडावरचा घाम पुसून मी गट्टा बाजूला सारला. आणि जाहिरात कां दिली याचा विचार करूं लागलो...

त्याच विचारांत असताना पहांटे एकाएकीं आमच्या घरापुढें गिल्ला ऐकूं आला कुठंतरी आग लागली असेल असें वाटून मीं पाया-वरचा रग डोक्यावर ओढून घेतला. पण बाहेर लवकरच माझ्या नांवाच्या आरोळ्या ऐकूं आल्या

'गायतोंडे आहेत कां ?'

'पोपट गायतोंडे,–जिंदाबाद'

'गायतोंड्यांच्या पोपटांच्या, विजय असो !'

एकाएकीं माझ्या नांवाचे नारे देण्यासारखं मीं काय केलें मला कळेना. एकदां वाटलें संरक्षण मंत्री म्हणून माझी परस्पर नेमणूक करण्यांत आली असावी...मी डोळे चोळत दाराशीं आलों. सुमारे आठदहा हजार सायकल स्वार माझ्या दाराशीं भल्या पहाटे आले होते. धुरी देऊन बिळांतून उंदीर काढावेत तशी ही मंडळी, 'मासिकाच्या कामाकरितां साहित्याची आवड असलेला माणूस हवा' या माझ्या जाहिरातीनें आपापल्या घराबाहेर काढली होती.

मी घाईघाईनें दरवाजा लोटून आंत आलों आणि नजिकच्या पोलिस चौकीला फोन केला. पांचच मिनिटांत पोलिसांची कुमक मला मिळाली आणि तिनें गर्दी पांगवली. ते गर्दी पांगवत असतांना मी आमच्या तिसऱ्या मजल्यावर लाऊडस्पीकर लावला. आणि त्यावरून नम्र स्वरांत, 'बंधूनो ! मी चुकलों, मला क्षमा करा, मी झक् मारली, मला क्षमा करा.' असे सारखे सांगत होतो...

एव्हाना आमच्या सुप्रसिद्ध वडिलांना जाग आली होती. घाई-घाईनें जागें होत त्यांनीं घाबऱ्या घाबऱ्या विचारलें,

'पोपट, पुन्हां पाणी आलं कां रे ?'

'धरणाचें !'

'आधींच फुटलेल्या धरणांतून पुन्हां कसं पाणी येईल ?'

तोंडचें पाणी पळून गेले असतांना, पोलिस दाराशीं आले असतांना, त्यांतून दारूबंदी सप्ताह नुकताच सुरूं झाला असतांना तशा अवस्थेंत वडिलांना पोलिसांपुढें येऊ देणें–('कांही झालं तरी जन्मदाते आहेत...') मी मागच्या मागें त्याना ढकलून दिलें आणि बाहेरून कडी लावली. 'पोलिसांना चहापाणी करून मग सांगतो' असें सांगून मीं त्यांचें तोंड तात्पुरतें बंद केलें.

पोलिस गेल्यावर त्यांनी पुन्हां मला विचारलें,

'पोपट, पानशेत सारखंच झालं काय रे ?'

'धरणाचं काय लावून धरलंय तुम्ही सारखं ?' मी फारच चिडलो.

'पानशेत लोंढ्यासारखेंच चिनी केव्हां आले कळलं नाहीं–आपल्याला !'

'कुठें आहेत चिनी ?' मीं आसपास पाहत विचारलें...

'चिनीं नाहीत ? मग पोलिस कां आले होते. ?' त्यांनी मुद्याचा प्रश्न विचारला.

हातांत वर्तमानपत्र घेऊन अतिशय उत्साहानें मीं आलेली मासिकाची जाहिरात तीर्थरुपांना दाखवली. त्यांनी चाळिशी आणून ती वाचली, आणि ते एकाएकी विलक्षण असंबद्ध कां बोलूं लागले मला कळेना.




क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ गीता २-३ ॥

भारता आज तुला एकच गोष्ट अटळ ध्रुव-ताऱ्याप्रमाणें समोर ठेवावयास हवी. ती अशी कीं तूं परंतप आहेस. पर म्हणजे शत्रु. जो तुझ्या अहिताला प्रवृत्त झाला, असेल तो. त्याला ताप दिल्याशिवाय त्याच्या आगळिकीला उचित असा कठोर दंड त्याला दिल्याशिवाय, तूं शांती पावणार नाहींस. आणि आगळीक केल्यावर त्याला दंड करावा कीं न करावा असा विचारहि करावयाची तुला जरूरहि नाहीं. अतिविचारानें क्लीबता येते. कार्याकार्य विवेक सुटतो. तेजाची प्रतापी परंपरा असलेल्या तुला क्लीबता सर्वस्वी अनुचित आहे. हृदयाची दुर्बलता ही क्षुद्र गोष्ट तुझ्यासारख्या महत्तमाला शोभणार नाहीं. तिचा त्यागच करावयास हवा. शत्रूच्या शिरावर पाय देण्यासाठीं तुला रणशिंग फुंकून उठावयासच हवें.

भारता, प्रसंग ठेपला म्हणजे भल्याभल्यांची बुद्धी चळते. करूं नये तें करावेसें वाटतें. सुचूं नये ते विचार सुचतात.

**तूं जाणता तरी म्हणविसी–परी नेणिवेतें न संडिसी**
**आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी–बहुसाल नीती ॥ ज्ञा.२।९२॥**

अशी मोठमोमोठ्यांची अवस्था होते. असे अनेक मोठे लोक आज आपला पांवा अशा सुरामध्यें वाजवीत आहेत कीं त्या सुरांनीं क्लीबतेचाच गौरव व्हावा. तूं विश्वस्त असतां तुझ्यावर शत्रूनें हल्ला केला आणि त्या अनपेक्षित आघातानें खचून तूं क्षणभर दोन पावलें मागें सरलास. भारता, कारण कोणतेंही असो. मागें सरणें ही गोष्ट नामोहरामीची आहे असा तुझा अटळ विश्वास असावयास हवा. खराशी लढा देताना श्री रामचंद्र पवित्रा म्हणून तीन पावलं हटले तरीही त्या हटण्यामुळें त्यांच्या पौरुषाला कलंक लागला असें मानणारा तुझा पिंड आहे. या पिंडाला तूं जागावयास हवें. मी विश्वस्त असतां शत्रूनें गळा कापला या समर्थनांत गौरव नाहीं. अनुचित जागीं ठिला विश्वास ठेवणें यांत आपल्या बुद्धीस उणेपणाच आहे. संगती कुणाची धरावी. विश्वास कुणावर ठेवावा किती ठेवावा याचाही विचार यशाची आकांक्षा धरणारास हवा.

**ओळखीवीण संग धरी ॥ तो एक मूर्ख ॥** असें रामदासांनीं उगाच म्हटलेलें नाहीं. ( दा. २-१-२१ ) भारता, मूर्खपणा झाला असेल

तर त्याची कबुली देण्यांत शहाणपणा आहे. पण समर्थनांत शहाणपणा नाहीं. गांधींचा वारसा आपण सांगतों. हें आपणांस पटावयास हवें. इतिहासाचा धडा घेण्यांत मानवाची प्रगती असते. घडलेली चूक पुन्हां घडूं न देणें हा सुबुद्ध समर्थांचा मार्ग तूं धर. त्या चुकीचें समर्थन करीत बसण्याचा वेडा पंढपणा करूं नकोस. पिचका पांवा रणाचें स्फुरण आणणार नाहीं त्याला रणशिंगच हवें चुकांच्या समर्थनाची संवय लागली कीं मन निलाजरें बनतें. सारी शक्ती समर्थनें शोधण्यांत खर्च पडते-

I do not want excuses for failure. I simply want the work done. असा जो आदेश तुला पंडित नेहरू यांनीं दिला आहे त्याचे इंगित ध्यानांत घे.

शत्रूनें दगा दिला हें समर्थन दिलें आहे. अरे शत्रुच तो. तो दगा देणार नाहीं तर काय करणार ? दगा देणें हें त्याचें कर्तव्य आणि त्याला हाणणें हें तुझें कर्तव्य. शत्रू पर्वतावर होता आम्ही खालीं होतों, त्याला अमूक अनुकूल होतें. आम्हांस प्रतिकूल होतें हें रडगाणें कामाचें नाहीं. शत्रू जागा राहिला तूं झोपलास ही नामुष्की आहे. शत्रू योजना आखूनच अनुकूल जागीं आला ना ? तूं आपणास अनुकूल अशा जागेची योजना कां नाहीं आखलीस ? राजकारण म्हणजे का लग्नाची पंगत आहे ? कीं सांस्कृतिक शिष्टमंडळ आहे ? कीं गुलाबाची शेज आहे ? राजकारण हा जागृतांचा खेळ आहे. गलथान विश्वस्ताचा नव्हे. आतां राजकारणांत रणकारणाची भर पडली आहे. आता तर एकच गोष्ट तुजसमोर हवी. ऊठ. ऊठ. आणि युद्ध कर. तुला ज्यानें दगा दिला त्याला दंड कर. क्लीबता आणणारीं गतचुकांची समर्थनें सोडून दे. रणांत शत्रू दगा देणारच. पर्वत आडवे येणारच. ते पर्वत चढणें हेंच तुझें काम आहे. तूं प्रत्येक पाऊल पुढेंच टाकावयास हवें.

हृदयाचें ढिलेपण ॥ एथ निकयासीं नव्हे कारण ॥
हें संग्रामी पतन जाण ॥ क्षत्रियांसी ॥
म्हणोनी शोकु न करी ॥ तूं पुरता धीरु धरी ॥
हे शोच्यता अव्हेरी ॥ पंडुकुमरा ॥ ज्ञा. २।२१–२८ ॥

हे भारता, हे यशवंता, धीर धर आणि शत्रुला दंड कर. आज हेंच तुझें कर्तव्य आहे.

–उषाकान्त

●●●

'तिचा न् तुझा संबंध केव्हांपासून आला ?' त्यांनी विचारलें. मला कांहीं कळेना. तीर्थरूपांना ताप चढलाय् कीं काय असें वाटून मी त्यांच्या कपाळाला हात लावून पाहाणार होतें. पण 'म्हणजे ?', हा प्रश्नार्थक शब्द तोंडाबाहेर केव्हां पडला हें मला कळलेंहि नाही...

'गाढवाच्या लेका, आतां पोलिस चौकशी होईल. तो मंत्री आहे...चढा फांसावर आतां आम्हाला घेऊन...'

मी जास्तच बुचकाळ्यांत पडलो. मीहि रागावलो,—

'मी चढणार नाहीं...'

'मग भानगडी करायला सांगतो कोण ? आम्हीहि केल्या भानगडी, पण कधी मंत्र्याची मुलगी नाही पाहिली...!'

'भानगडी कुणी केल्या ?' मी ओरडलो.

'मग याचा अर्थ काय ? ओरडण्यांतहि 'तुझा बाप आहे, हे त्यांनी सिद्ध केलें !'

'कशाचा ?'

बऱ्याच आरडाओरडीनंतर सगळ्याचा अर्थ लागला. त्यांनी चुकून जाहिराती शेजारची, एका मंत्र्याच्या मुलीची आत्महत्येची बातमी वाचली होती. त्या मुलीचे आणि माझे कांही गर्हा संबंध होते असा समज करून घेऊन ते माझ्याशी बोलत होते. जेव्हा मीं हॅम्लेटच्या–'तें चित्र पहा आणि हें चित्र पहा' या चालीवर 'तें वाचा आणि हेंहि वाचा' असें म्हणून माझ्या मासिकाची जाहिरात दाखवली तेव्हां त्यांनीं नुसते 'हूंऽऽ' केलें–(शब्दशून्य स्वर किती अर्थपूर्ण असूं शकतो तें तेव्हां मला कळलें)–आणि मी पुढें एक तासभर त्यांच्या नाकाशीं कांदा धरून होतो....

सुमारें मणभर कांदे फोडून मी त्यांच्या नाकाशीं लावून धरले तरी एका तासानंतरहि तीर्थरुप शुद्धीवर येईनात. बेशुद्धींत देखील त्यांनी आपला हट्टीपणाचा स्वभाव कायम ठेवला. मीं धाईधाईनें हॉस्पीटलला फोन केला, आणि ॲम्ब्युलन्स मागवली. पंधरा मिनिटांत पुन्हां पंचवीस हत्यारी पोलिसांची एक तुकडी आलेली पाहिल्यावर मी चमकलो. मींच चुकून पुन्हां पोलिसांनाच फोन केल्यामुळें त्यांना यावें लागलें; असें कळलें. त्यांची क्षमा मागून मी त्याना परत पाठवले, गांवातल्या यच्चयावत् डॉक्टराना फोन केले. एक डॉक्टर मोकळा नव्हता. प्रत्येक फोनवर मला, 'कुणी पोपट गायतोंडे नांवाच्या इसमानें मासिक सुरू केल्यानें गांवांतले निम्मे लोक आजारी पडले आहेत. ते तिकडे एंगेज्ड आहेत...' असें कळलें. पुढें मी फारसा फंदांत पडलो नाही. शुद्धीवर येण्याची सर्व जबाबदारी मी वडिलांच्यावर सोपवून पुढल्या तयारीला लागलो...

आजपर्यंत मीं लग्नाच्या याद्या ऐकून होतो. लेखकांचीहि यादी करावी लागते हें मला रघू साठेकडून कळलें. त्याच्या सल्ल्यानें मी संयुक्त महाराष्ट्रांतील भल्याभल्या लेखकांची यादी तयार केली. या विषयांतील माझी एक नामांकित आयडिया मीं रघूला सांगितली,

'रघोबा, या सर्व लोकांची यादी आपण टाइम्स ऑफ महाराष्ट्रांत टाकूं या आणि सर्वांनी आमच्याकडे कथा पाठवा अशी कॉमन् विनंति करूं या....'

मला ताप चढला आहे असें वाटून रघूनें गळ्याला हात लावून पाहिलें, तेव्हां आपलें कांहींतरी चुकलें आहे, हें मला स्पष्ट कळलें. रघू रिंग मास्तर सारखा ओरडला.

'गाढवा, तुझी पर्सनल लेटर्स त्यांना गेलीं पाहिजेत. शक्य तर तूं त्यांना भेटायला हवेंस...छॅः तुझ्यांत कांहीं अर्थ नाहीं...'

मी शिकाऊ जनावराप्रमाणे त्याच्याकडे पाहात राहिलों. अतिशय पडेल स्वरांत मी म्हणालो,

'बरं..., मला पत्रेंच पाठवणें शक्य आहे हें तूं पाहतोसच–आहे ना ?'

रघूनें कांहीं न बोलतां कोऱ्या पत्रांचा गठ्ठाच माझ्यापुढें टाकला.

'ल्ही ऽऽ' व्यास थाटांत तो म्हणाला

तो डिक्टेट करूं लागला आणि मीं लिहूं लागलो. पत्रें लिहून झाल्यावर रघूनें आणखी एक सल्ला सांगितला, कीं सातारकडला गणपति आडसूळकर याच्या लेखनानें पहिल्या कंपोझचा शुभ मुहूर्त करायचा. मी पुन्हां 'बरं...बरं' म्हटलें, आणि आम्ही कागद आणायला बाहेर पडलों...



अनुक्रमणिका

आठदहा दिवसांनी चंदनमल चोकसीमला तीन हजाराचा चेक मी फाडून दिला आणि अठ्ठावीस पौंडी कागद खरेदी केला. मध्यंतरी आलेलं मॅटर मीं चित्रकाराकडे दिलें होतें. ते येतां येतां आणायला गेलों. त्याच्या ' ब्लॉक हाफटोन करा ' या सल्ल्यानें मी ' म्हणजे काय करा ' आणि नेमके काय करायचे हें कळल्यासारखें दाखवून, ' छे, छे ' मी फुल्टोनच करणार आहे...' असें बेधडक म्हणालो. तो चित्रकार पुन्हां माझ्याकडे कां आला नाही कोण जाणे !

आलेले कागद मीं घाईघाईने छापखानेवाल्याला दिले. ब्लॉक-मेकरकडून आलेले ब्लॉक्स आणि मॅटरहि कसेंबसें पाठवून दिले आणि प्रुफांची वाट पाहूं लागलो...

एके दिवशीं सकाळीं पहिल्याच कथेची गॅली शेवटची ठरली. सकाळच्या ओल्या उन्हाबरोबर माझ्या कचेरीच्या दाराशीं कोर्टाचा बेलीफ नोटीस घेऊन उभा राहिला. कसाबसा तोल सावरून मीं सही केली. त्यानंतर बेलीफ केव्हां गेला हें भिंतीवरच्या खंडोबालाच माहित. मी डोळे उघडले तेव्हां संध्याकाळ झाली होती. आणि आमचे फॅमिली डॉक्टर बॅग बंद करून जायच्या तयारींत होते. मासिकाचा चित्रकार सदू सोंद माझ्या कपाळावरील दुधाच्या पट्ट्या बदलत होता, असें चित्र मला दिसलें...

तीर्थरूपांनी सर्व्हायव्हर म्हणून बॅंकेला, ' माझे थोरले चिरंजीव पोपट गायतोंडे व. व. २९ व्या वर्षी सोमवार दि. २६–६–५८ रोजीं संध्याकाळी मला मेले...' असा माझा न झालेला गृह्यसंस्कार कळवून माझ्या नांवावरची पंचविस हजाराची सर्व रक्कम काढून घेतली होती आणि चंदनमल ( कागदाचे जंगी व्यापारी ) यांनी माझ्यावर बॅंकेत पैसे नसतांना खोटा चेक दिल्याबद्दल इं. पि. को. ४२० खालीं नोटीस बजावली होती. आणि माझे मासिक पोर गर्भातच मेलें होतें...

मी मासिक काढून बुडलों असतों तरी चाललें असतें, पण–पण तीर्थरूपानी माझी सदरहू मिळकत संरक्षण निधीला दिली याचें मला फार वाईट वाटलें....

तात्पर्य, मारवाड्याच्यांत भाड्यानें बायका रडायला आणतात तसे वडिलांनी भाड्यानें गडी आणून– ( त्यांना एकट्याला मी आवरणें शक्य नव्हते एवढे तरी त्यांना कळलें हें ठीक झालें. )–माझी कणीक तिंबली, आणि फिरून त्यांनीं माझ्या हातांत डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर खात्याचा नांगर दिला आहे.

पाहीन पाहीन नाहीतर शिरेन राजकारणांत... •••



......अन् शेवटीं आम्हीं मासिक—नव्हे, 'दिवाळें' काढलें !



# आ|सो|स

*प्रयासानं शब्द लिहिले जातात. कार्डाच्या कोपऱ्यांत एवढं मावत.*
*पुढचं सारं मोकळंच. नुसता व्याप. सारीं पोकळीं !*
*शब्द हरवले जातात....भावनांची गर्दी होते. आणि मागून एक सावली सरकते......*

**प**रसांतल्या केळीला वारा शिवतो. ती थरारते. थरारते ती तृतीच्या जाणीवेनं. आशेच्या स्पर्शानं. तिच्या थरारण्यांत ध्यास आहे. हव्यास आहे. केळीला वाऱ्याचा पुन्हां स्पर्श होतो. पुन्हा आशा, पुन्हा तृप्ति अन् वाऱ्याच्या नादानं कुठला तरी, कसला तरी हव्यास उरांशीं धरून डोलणं. डोलणं आणि घटकाभर नादावणं. नादांत भीतीला आठवत, स्वतःला वाऱ्याच्या हवालीं करून देणं. चावट वाऱ्यालाहि तेंच हवं असतं. केळीला तें नको असतं असं कसं म्हणतां येईल.

केळीची पानं हलतात. केळफूल विनाकारण डोलतं. पाळण्याला लावलेलं लालचुटूक खेळणं हलावं तसं हलतं. मावळतीची किरणं केळ-फुलाच्या ओठावर रेंगाळतात आणि पिऊन तृप्त झालेल्या ओठाप्रमाणं लिवलिवत तशीच डोलत असतात.

जान्हवीचा उर हलतो. कसला तरी सल तिला दुखावून जातो आणि ती सुखावते. तिला आकाशींचा रंग अधिक गडद झाल्या-सारखा वाटतो. परसाच्या चौकटींतून वळणावर दिसणारं गुलमोहराचं झाड इतकं लालसर कसं झालं याची शंका मनाला चाटते.

'सूनबाई !'





अनुक्रमणिका

'आलें.

सासूबाईंची हांक कानीं येते आणि झालेली भखमली जाणीव हृदयाच्या मंजुषेत महाय-श्याच्या काळजीनं जपून ठेवते. ही जपलेली जाणीव तिला पुन्हा ल्यायची असते. जान्हवी खांद्यावरचा पदर सावरीत सासुबाईंच्या हाकेला तत्पर होऊन चालूं लागते पण तिचं तें चालणं ई केवळ केविलवाणं घोटाळणं होतं. आतांशा तिच्यांत तो पूर्वीचा वेग उरलेला नसतो.

'सूनबाई, अग उद्याशाला वाती नाही वेटा.'

'वळून ठेवते मी.'

खोल जाणीवेच्या मनांतून अर्थ कळेल इतपत ध्वनी करणारे ते नुसते शब्द असतात.

'अंता आला कां ग शाळेंतून ?'

'अजून आले नाही.'

'बसला असेल माळावर निवडुंगाची बोंडं झाडीत, अन् आल्यावर लाल ओट माझ्यापुढं दाखवत म्हणेल–'

हें म्हणायच्या आधीं जान्हवीला केळफुलाच्या लालचुटूक ओटांचा आठव होतो. सासूबाई सांगत असतात—

'—बघ आई मी पोपट झालों.'

जान्हवी खुद्कन हसते. माजघरांत जाते. दुरडींतील कापूस घेऊन परतते. एका वाटींत पाणी घेते आणि त्यांत थोडं कुंकू टाकते. बोटं बुडवून एकसारखं करते. बोटाची कांडं लाल होतात. तिला शुभ वाटतं. त्याच्याकडे क्षणभर बघते आणि मनाला हवासा असा गोड चाळा मिळतो. तीं लाल झालेली बोटं एकत्र जुळवते आणि पुन्हा विलग करते. पुन्हा जुळवते, पुन्हा विलग करते. क्षणांत केळफुलाच्या तृत झालेल्या लालचुटूक ओटांचा पुन्हा एकदां आठव होतो.

पण हें सारं आजच कां रंगावं हें मात्र तिच्या मनाला कोडं असतं. केळफुलाचे ओट आणखी लाल कां वाटावे ? दाराच्या चौकटींतून दिसणारा गुलमोहोर तर रोजचाच आहे, आणि हें निळं निळं दिसणारं आकाश सगळ्यां-चंच आहे, सगळ्यांनाच दिसतं, नेहमी दिसतं पण आपल्याला आजच तें जास्त निळं कां वाटावं ? आपण वाती वळतांना पाण्यांत् कुंकू कधीं घोळत नाहीं कां ? तें तर रोजचंच . हं ! काय बावळटपण हें ? आजचं तें रोजचंच मग रोजचंच तें आज नवीन कां वाटावं ?

जान्हवी ओट्याच्या पायऱ्या हळूहळू उतरूं लागते. समोरचं अंगण कसं स्वच्छ असतं. वृन्दावनाजवळचा ओटा सारवलेला असतो. सकाळीं रांगोळीनं रेखलेलं गोपद्म, बिल्वदल तसंच असतं. ताजं असतं. तिथ ओट्यावर जाऊन बसते. चालण्यानं किंचित् धाप लागली असं वाटतं. ओट एकमेकांपासून विलग होतात आणि उर खालीवर होतो. ती एका पायाची मांडी घालते आणि डोकं वृन्दावनाच्या काठाला टेकलेलं असतं. वाऱ्याची झुळूक येते. कृष्ण तुळशीची मंजिरी झुलून जान्हवीच्या कानापर्यंत लवतें. जणुं तिला सांगायचं असतं—

वेडे ! तुझी व्यथा मी जाणते, पण त्यामुळं येवढं व्यथित होणं हळवेपणाचं आहे. प्रत्येक स्त्रीला अस कांहीं तरी व्हावं अस सारखं वाटत असतं. असं होण्याचा हव्यास असतो. या वाटण्याचं येवढं काय वाटून घेतेसी ?–मृत्तिकेला उलावंच लागतं–मृगरंगांना पडावंच लागतं–मृद्गंधाला पसरावंच लागतं आणि मनाला क्षणभर वेडं व्हावंच लागतं ! आणि असं जर झालं नाहीं तर जीव गुदमरतो, उबतो, शुष्क होतो. मग एखाद्या वांझ वृक्षासारखं त्याला एकटं, एकाकी आणि परित्यक्त आयुष्य घालवावं लागतं. पण छे ! असं कांहीतरीच कसं आलं माझ्या मनांत. तुला तर अजून खूप रंगायचं आहे—

तितक्यांत अंता शाळेंतून येतो. तरवडाच्या हिरवा फोक हातांत घेऊन भिंतीवर, जमिनीवर सपाकसप् सपकत् दारांतून ओरडतच येतो.

'वैने– एऽऽवैने !'

अंता थेट आंत येतो. गळ्यांतलं दप्तर फेकून देतो आणि जान्हवीच्या कुशींत जाऊन धाडकन् आदळतो. ती जोरानं श्वास घेते. तितक्यांत आई सरपण आणायला म्हणून अंगणांत येतें. ती ओरडते—

'अंत्या ! मेल्या काय धसमुसळ्या आहे रे ? काय झालं ग आई ?'

'ए–तिच्या अंगाशीं असा झटत जाऊं नको बरं.'

अशा ऐन उधाणाच्यावेळीं अंताला आईचं रागावणं आवडत नाहीं. तो हिरमुसला होतो आणि जान्हवीच्या कुशींतून डोकं वर करतो, दप्तर हातांत घेऊन मुकाट्यानं चालूं लागतो. आपल्याला वैनीन थांबवावं अस वाटतं आणि तो तिच्या हाकेची वाट बघत हळूंहळूं चालूं लागतो.

'अहो–इकडं या की.'

तरीहि अंता विनाकारण फुरंगटतो. त्याला आईचा राग आलेला असतो पण वैनीवर फुरंगटण्याचं कारण त्याला स्वतःलाच कळत नाहीं.

'राग आला कां एकाला ?'

'हूंऽ !' उगाच हुंकार.

'इकडं या म्हणते ना ?'

'नाहीं येणार.'

'अहो या कीं !'

'नाहीं, नाहीं, नाहीं. तीन वेळा म्हटलं मी नाहीं.

'पण आमच्यावर कां हो राग ?'

'मला हाक मार म्हणजे येईन'

'हांक मारलं की हो तुम्हाला मघा'

'नाहीं हाक मारली'

'आता बाई'

'भावजी म्हण वैने मला.'

'अहो या अंता भावजी !'

अंतानं दप्तर फेकून दिलेलं असतं आणि वैनीच्या गळ्यांत जाऊन पडल्याशिवाय अन्ताला करमत नसत आणि अंता भावजी जवळ आले नाहींत तर वैनीच्या मनाला मोकळं वाटत नसतं. जवळ घेतल्यावर मात्र मनाला बाळसं येई.

'कुठं गेला होता भावजी तुम्हीं ?'

'अग बोंडं झाडायला.'

'कुठं माळावर ?'

'हो. पण वैने–बघ कीं माझे ओठ कसे छान–'

'पोपटासारखे लाल आहेत, असंच कीं नाहीं ?'

'वैने तूं कसं ओळखलं मी काय म्हणणार तें ?'

'तुमच्या मनांतली परी माझ्या मनांत येऊन सांगती.'

'खरं का काय ?

'खरं'

'मग वैने मी आज चिंचा खाल्ल्या हें नाहीं सांगितल ना परीनं ?'

'सांगितलं.'

'मग वैन, आईला नको सांगूं.'

'पण आमचं एक काम करा–'

प्रभाकर पुराणिक





अनुक्रमणिका

' सांगा–'

' आम्हाला द्या की थोड्या चिंचा '

' अग थोड्या काय पुष्कळ. '

अंता ताडकन् उभा राहातो. खिशामधें हात कोंबून भसाकभर चिंचा वैनीच्या पुढं फेकून देतो. ती त्या गाभुळलेल्या चिंचा बघते त्यानंच तिचं तोंड आंबतं आणि अंगावर शहारें आल्यासारखें वाटतात. लहानपणीं ती चिंचा ओटींत भरून माळदावर जाऊन खायची. तेव्हां ती चिंचा खायची त्या स्वतः-करितां आणि आतां ह्या चिंचा आपल्याला नको तरी आपण खातो–कुणासाठीं खातो याचं उत्तर ती शोधत होती.

' अंता भावजी, ते तुमचे लाल ओठ दाखवा बघू '

' बघ, पण दुरून बघ ऑंऽऽ ! '

' कां हो ?'

' तूं आमचे ओठ चिमटींत धरून पिळतेस.'

' नाही हो '

' नाही हो काय–नेहमी करतेस तसं. आमच्या ओठांना तसं कांही करायचं नाही. '

' अहो नाहीं भावजी !

' नाहीं म्हणतेस आणि नेहमी करतेस तसं. दादा विडा खाऊन ओठ रंगवतो तेव्हां तसं कांहीं करत नाहींस तूं. '

केवळ एक तक्रार. खरं वाटलं म्हणून केलेलं एक रोखठोक विधान. त्यांत सत्याविषयीं खात्री पण शंकेला मुळी वावच नाहीं. साध्या शब्दांनीं वातावरण लाल झालं आणि जान्हवी मात्र उगाच–रंगुनी रंगांत मधुर—

आज दोन अडीच वर्षं झाली त्या गोष्टीला पण आठवणींनं गेलेला काळ मोजत बसण्याची आठवणच तिला राहिली नाहीं. किंबहुना मुद्दाम आठवण ठेवावी याची गरजहि वाटली नाही तिला. कारण सारं कसं वर्तमान होतं. तिच्याच जवळ होतं. वर्तमानकाळ कधीं भूतकाळ झालाच नव्हता. तिला सारं कांहीं हें असं असं आठवतं—

प्रदोशकालाला उंबरठ्यावर मापटं भरून ठेवलं होतं. पिवळ्या पावलानं तें सांडलं गेलं होतं. सनईचे सूर घुमले होते आणि स्वरांच्या लहरीवर दाराच्या चौकटीचं आंब्याचें तोरण किंचित् डोलून गेलं होतं. नव्या कोऱ्या जोड-व्याच्या टच् आवाजनं तिला सांगितलं होतं–बाई, पाऊल ठेवलं तें घर तुझंच आहे—

तेंव्हांपासून तें घर तिचंच आहे. जीव टाक-णाऱ्या जिवाचं प्रेम तिचंच आहे. सासूची माया तिची आई झाली आहे. सासऱ्याचा जिव्हाळा तिचा बाप झाला आहे. अंताचा अवखळपणा तिचं लेकरूं झाला आहे. तरीहि हें सारं आजच असं वेगळ्या जाणीवेनं कां जाण-वावं असं तिचं तिलाच वाटतं.

कधीं नव्हं तें आज तिला वाटून जातं कीं–तिच्यावर जीव टाकणारा जीव तिच्या जवळ असावा. आज चार महिने झाले. खाकी वेष घालून तो जो दृष्टी आड झाला ते अजून ना पत्र ना चिठ्ठी ! जातांना सांगून गेला–' खूप दिवस रहावं लागेल.' पण किती दिवस ? सुमार नाहीं कां त्याला ? त्याची त्या वेषांतली काय ती ऐट आणि मनाला भुरळ पाडणारा रुबाब !

–हो ! सारं कसं आपणच करायचं आणि बोल मात्र दुसऱ्याला लावायचा. ती-कव –ते श्वास–ते–हुंकार–डोळ्याच्या पापण्या मंदपणें उचलायच्या–नजरा जुळवायच्या–नजरेनंच प्रश्न विचारायचे आणि प्रश्न समजल्याचा आव आणून नजरेनंच उत्तरं द्यायची. हें सारं आपणच करायचं. आपणच दुसऱ्याला वेड लावायचं आणि दुसऱ्याला वेडं वेडं म्हणून चिडवित बसायचं !

जान्हवीला हें सारं अंताच्या मोठ्या भावाला हडसून खडसून सांगावसं वाटतं. तिच्याजवळ भाव असतात, शब्द नसतात. शब्द नसतात म्हणण्यापेक्षां शब्द येत नसतात. शब्दांचं तुटकं मुटकं ज्ञान असतं पण ते फार तोकडं. भावनेच्या पंखाला आकाशीं उडायला शब्दाचिये बळ नसते. ती मनांतल्या मनांत अक्षरांची जुळवणी करते. प्रथम शब्द नंतर वर्ण.

' सूनबाई, वाती झाल्या ग ?'

' करतेच '

ती कुंकवाच्या पाण्यांत बोट बुडवते आणि कापूस घेऊन वाती वळूं लागते.

' वैने ! हें काय ग, ठेव ते बाजुला आणि खेळ माझ्या बरोबर. हल्ली तूं खेळत नाहीस बघ-'

' भावजी मला वाती करावयाच्या आहेत. '

' वैने किती सुंदर केल्या या वाती ! लाल लाल देठ. पारिजातकाची फुलं आहेत कां ग ही ? '

' भावजी, चाहाटळपणा पुरे हा. नुसतं बोलबोल बोलायचं. तुम्ही हल्लीं अभ्यास करत नाही ऑं...'

' अभ्यास ! '

नसत्या वेळीं आलेल्या या शब्दाच्या जळ-वाळा झटकतो.

' हो अभ्यास. तुम्ही मुळीच अभ्यास करीत नाहीं. '

' वाग ग वा ! कांही विचार, सांगतो कां नाही बघ '

' बघू बरं. आणा लेखणी पाटी. '

अंताला वैनीकडून आव्हान मिळतं. तो धांवत जाऊन कोपऱ्यांत फेकलेलं दप्तर कुरवा-ळींत घेऊन येतो. वैनीसमोर बैठक मारून तिच्याकडे बघत बसतो.

' सांग की वैने आतां का भितेस ? '

' सांगू ? '

' सांग. '

लिहून दाखवा बरं मला शब्द '

' कोणता शब्द ?'

' लिहा...नमस्कार '

' हं त्यांत काय, न–म–अर्धा स–त्याला क पूर्ण आणि क ला काना–का–रथाचा र ! '

' झालं ?'

' हो '

' बरं–तव्येत लिहून दाखवा. '

' इतकं साधं येत नाही ? '

' मला येतं बरं कां ! '

' बरं हें बघ. त–य– त्याला अर्धा व–व्य–वर एक मात्रा आणि मग तट्टूचा त. '

' जपा–कसं लिहाल भावजी ? '

' हें बघ असं लिहितात–जपा '

' आता लिहा उत्तर '

' बघ नीट. उ–त–आणि तच्या मांडीवर एक आडवी रेघ द्यायची. नंतर रथाचा र '

' द्या–कसं लिहाल ?'

' आधीं रेघेच्या थोडं खालीं द काढायचा. मग तें जें सहा सारखं दिसतं त्यावर रेघेपर्यंत शेंडी काढायची आणि काना द्यायचा.'

जान्हवी सगळं मनांत टिपून घेते. न राहून त्याला म्हणते—

' भावजी–हें मला लिहिता येईल कां हो ?'

' पण तुला लिहिता येतं ना ?'

' येतं येतं–अं–भावजी, तुमचं अक्षर किती खराब आहे, चांगलं अक्षर काढायला शिका. पळा बरं इथून. '

अंताला क्षणभर आश्चर्य वाटतं. इतके दिवस आई बोलत होती. बाबा बोलतात. मास्तरांचं तर नेहमीचंच आहे पण—वैनीनं त्याच्या अभ्यासाच्या बाबतींत ढवळाढवळ केलेली त्याला स्मरत नसतं. पण आज ती सुद्धां त्याला बोलून जाते. अंता सारखा वैनीकडे बघत असतो आणि वहिनी अंतानं लिहिलेल्या




देशाच्या भरभराटी करितां रेल्वेंना अति महत्वाचें काम करावयाचें आहे. देशाच्या रक्षणा करितां आज तर त्यांचे वर अधिकच जबाबदारी येऊन पडली आहे.



मध्य रेल्वे

**भारताच्या संरक्षणासाठीं आपल्या रक्ताची, श्रमाची आणि धनाची (सोन्याची) अत्यन्त जरूरी आहे–तें अविलंब द्या**





अनुक्रमणिका

**–खासा न्याय–**

इंग्लंडचे सध्यांचे पंतप्रधान श्री. हॅरोल्ड मॅक्मिलन हे दुसऱ्या युद्धाच्या वेळीं अल्जेरियामध्यें रेसिडेंट अधिकारी म्हणून काम पहात होते. ब्रिटिश आणि अमेरिकन अधिकारी ह्यांच्यामध्यें निर्माण झालेला मतभेद मिटविण्यासाटीं त्यांना सैन्याच्या खाणावळींत बोलाविण्यांत आले. झगडा असा होता—अमेरिकनांना जेवणाआधीं दारू पाहिजे होती. ब्रिटिशांना जेवणानंतर दारू हवी होती.

एका क्षणांत मॅक्मिलन ह्यांनीं निर्णय दिला—'ह्यापुढें अमेरिकनांचा मान राखण्यासाटीं आपण सगळें जेवणाआधीं दारू पीत जाऊं आणि ब्रिटिशांचा मान राखण्यासाटीं आपण सगळें जेवणानंतरही दारू पीत जाऊं.'

पाटीकडे बघत असते. एकेक शब्द मनांत टिपून ठेवीत होती.

जान्हवी कमरेच्या केळांत हात घालते आणि पैसे काढून अंताच्या हातावर ठेवत म्हणते—

'भावजी हे पैसे घ्या–हें बघा, फडताळांत मधल्या खणांत लहान पितळेच्या डब्यांत लाडू ठेवला आहे तो घ्या...'

'पण वैने हे पैसे कशाला ?'

'हो, काहो पोष्टाचं कार्ड कितीला मिळतं ?'

'पांच नवे पैसे.'

'तुमच्या हातांत किती पैसे दिले मी ?'

'तीन'

'मग असं करा, ओसरीच्या खांडावर मी पैसे ठेवले आहेत त्यांतून पैसे घ्या आणि एक कार्ड आणा.'

अंता डोक्यांत टोपी फसवतो आणि तोंडानं चिंग् चिंग् चिंगाट् चिंगाट् असा आवाज करत धावत जातो.

ंतापर्यंत बरीच संध्याकाळ झालेली असते. कुळकर्णी मास्तर संध्या करीत बसले असतात. अंता ओवरींत त्यांची वाट बघत बसला असतो. बराच वेळ होतो कुळकर्णी मास्तर येत नाहींत. तळखड्याला टेकून अंताची पाठ लागून येते. तो जायला निघतो तितक्यांत मास्तर येतात.

'काय रे अंता ?'

'कार्ड सांगितलं.'

'कुणी ?'

'वैनीनं.'

'अग वैनी पत्र लिहिणार होय रे !'

'वैनीला टाकूक.'

मास्तर हसतात. मांडवगणांतलं तें सरकारी पोष्ट घरगुतीच असतं. मास्तर जानव्याच्या किल्लीनं तें सरकारी कपाट उघडतात. अंता कार्ड घेऊन पळत येतो. पुन्हां तोंडानं चिंग् चिंग् चिंगाट् चिंगाट् !

घरांतील सगळीं कामं आवरली जातात. एक कंदील घरांतला अंधार सावरीत इकडून तिकडे फिरत असतो. मधेंच भाकरीचा चुर्रऽऽ आवाज होतो तेव्हां भाकरी तव्यावर टाकली असावी असं वाटतं. बाहेरच्या बैठकींतून पुरुषी आवाजांत स्तोत्र म्हटलं जातं. देवघरांतून पर्वचा ऐकूं येतो. मधेंच बांगड्यांची किण् किण् येते. देवाजवळ तेवत असणाऱ्या नंदादीपाचा गुल झाडला जातो. वारा आतांहि वाहात असतो. केळी आतांहि थरारत असते. पण दिसत नाहीं.

सगळीं कामं आटोपलीं जातात. जेवण उरकून बराच वेळ झालेला असतो. मामंजी झोपलेले असतात. सासुबाई नुकत्याच अंथरुणावर डोळे मिटून स्वस्थ असतात. अंता मात्र वैनीच्या मागं पिंगा घालीत असतो. तिच्याच जवळ निजण्याचा हट्ट धरतो. आई तिकडून ओरडते—

'अंत्या, कसली भूणभूण लावली ?'

'मला वैनीजवळ निजायचं.'

'कांही नाही तुला लाथा झाडायची सवय आहे झोपेंत.'

अंताला पुन्हा आईचा राग येतो. वैनीचा सुद्धां राग येऊं लागतो. तितक्यांत वैनी येते आणि अंताच्या केसांतून बोटं फिरवत दंडाला धरून निजायला घेऊन जाते. कंदील बारीक केला जातो आणि दोघं माजघरांत निजायला जातात. अंता वैनीच्या कुशींत झोपीं जातो. सगळे झोपतात पण जान्हवी मात्र मनांत मघाचे पाटीवरचे शब्द गिरवत असते. अंधाराच्या काळ्या पाटीवर दृष्टीच्या लेखणीनं सारं सारं लिहिलं जातं. तें पुन्हा पुन्हा वाचायचं आणि मनाला पटलं नाहीं म्हणून पुन्हा पुन्हा मिटवायचं.

जान्हवी अंताला हळूच उठवते.

'भावजी, अहो भावजी !'

'अंता उठत नाहीं. वैनीला गच्च मिठी मारून पडतो. ती त्याला पुन्हा उठवण्याचा प्रयत्न करते. तो उठतो.

'अंता भावजी, तुमची दऊत लेखणी आहे कां हो अलिकडे ?'

'कां'

'मला पाहिजे'

'कशाला, मला झोपवून तूं रोज अभ्यास करते वाटतं ?'

'हो. अहो मला खूप मोटी परीक्षा द्यायची आहे. उटा ना, उटा. उटा आमचे शहाणे भावजी.'

अंता डोळे चोळत चोळत उठतो. सराईत हातानं कोनाड्यांतून दऊत आणतो. दप्तरांत असणारा टांक आणतो. जान्हवी उठते. ओसरींतला कंदील घेऊन येते. त्याची वात मोटी करते. कोपऱ्यांतली जाड मोटी परात पालथी घालून त्याच्या एका कोपऱ्याला कंदील ठेवते. मध्यभागीं कार्ड ठेवते. अंता दऊतीचं कागदी बूच काढतो आणि टाकाची उलटीं खोवलेली मराठी नीफ् सरळ करतो. जान्हवी टाक हातांत घेते. दऊतींत बुडवते मग विनाकारण झटकते. बांगड्यांचा आवाज होतो त्या डाव्या हातानं वर सरकवते. खुरमांडी घालून ओणवी बसते.

पुन्हा दऊतींत टाक बुडवते झटकते. पुन्हा बुडवते झटकते. कांही वेळ उगाच त्या कोऱ्या कार्डाकडे बघत असते. ओंट आवळले जातात. निफेचं टोक कार्डावर टेकलं जातं...

अननसाचा अ, हरणाचा ह त्याला काना वर एक मात्रा.

'अहो'

प्रयासानं शब्द लिहिले जातात. कार्डाच्या कोपऱ्यांत एवढं मावतं. पुढचं सारं मोकळंच असतं. नुसता व्याप. सारी पोकळी ! शब्द हरवले जातात. भावनांची गर्दी होते आणि त्या व्यापावर वेडीवाकडी पावलं टाकत नाचत असतात. ओठ अजूनहि आवळलेले असतात. ते अधिक आवळले जातात. डोळे स्थिर असतात. इतके अलोल आणि स्तब्ध कीं कोणत्या वेळेस डोळ्यांतली भावना ओघळेल सांगवत नाहीं. पुन्हां बांगड्या वर सरकवल्या जातात. ओठ आवळले जातात आणि निफेचे टोक कार्डावर टेकतं.........

मागून सावली सरकल्याची जान्हवीला चाहूल लागते. नजर वळते. कोण ? सासुबाई !! आई !!

'बाई, तुझ्यासारखीनं जागूं नये जास्त वेळ.'

गहिवराचे बांध फुटतात. जान्हवी स्वतःला सासुबाईंच्या कुशींत लोटून देते. अश्रूंच्या डोहांत मायेचं चांदणं पडतं–जान्हवी अश्रूस्नाता होते.

परसांतल्या केळीला वारा शिवतो. ती थरारते. थरारते ती तृप्तीच्या जाणीवेनं. आशेच्या स्पर्शानं......

अनुक्रमणिका

पान ९ वरून...
पोचेतो सद्या किशी येतील असं तो मनाशीं म्हणाला....आणि उगाचच त्यांचा विचार करीत बसला.

त्याचे मनाशीं कांहीं चाळे चालले होते, तसेच हातांचेहि. मधेच त्याचा हात टोपीशीं गेला. कागद चुरगळल्याचा आवाज झाला. त्याला कांहीं आठवलं. अलगद टोपी उचलून त्यानं तो कागद बाहेर काढला. पाहत राहिला. चारपांच दिवस त्यानं तो सावधपणें टोपींत ठेवून दिला होता. जपलेला होता. गमावल म्हणून निजायच्यावेळीं देखील तो डोचक्याला टोपी घालून निजला होता. डोचक्यावरनं टोपी काढली नव्हती. त्याच्या आईनं बाजाराच्या दिवशीं बाजारांतनं त्याला खायला जिलेबी आणून दिली होती. कागदाच्या पुडींतनं. जिलेबी खाऊन संपली. हात झाडले. त्याचं लक्ष कागदावरच्या चित्राकडं गेलं. ती शिनेमाची जाहिरात होती. जाहिरातींत एक चित्र होतं.........तेंच तें चित्र तो पाहात राहिला होता. त्यानं आतापर्यंत अनेक वेळां पाहिलं. दर वेळीं त्याला गंमत वाटली.—–तो निरखून पहात होता. चित्राच्या कल्पनेंत मशगूल होऊन गेला. सद्यानं तें चित्र त्याला समजावून सांगितलं होतं. त्याच्या डोळ्यांपुढं एक निराळं विश्व जिवंतपणं उभं झालं होतं. त्या आगळ्या विश्वांत तो गुरफटून गेला होता. बुडून गेला होता. कसलीं स्वप्नं त्याच्या नजरेपुढं तरंगायला लागलीं होतीं.

डोकं खाजवून खाजवून चित्राचा अर्थ लावायचा त्यानं प्रयत्न केला होता, पण त्याला त्याचा कांहींच अर्थ कळला नाहीं, कांहीं कळलंच नाहीं. तरीहि पुन्हां पुन्हां पडणाऱ्या कोळ्यासारखा प्रयत्न करून पाहिला होता. पण त्याच्या मनाचा कोळी जाळं चढून गेलाच नाहीं....तो अस्वस्थ झाला.

चित्राची त्याला दकल पडलीच नाहीं. आपल्या डोक्याच्या ताकदीप्रमाणं त्यानं विचार करूनहि उजेड पडला नाहीं. 'छ्या, आपल्या ताकदीबाहीरचं हाय' असं तो आपल्याशीं म्हणाला. त्याला वाटलं, आपण सद्याला विचारावं. तो बराबर सांगील. सद्यावर म्हाद्याचा लई विश्वास. त्याच्या दृष्टीनं सद्या सर्वज्ञ. त्याला सारं कळतं, त्याला कळत नाहीं असं जगांत कांहीं नाहीं अशी त्याची ठाम समजूत. त्यानं सद्याला विचारायचं ठरवलं. थापा, गंड्या-चौक्या गप्पा मारून दुसऱ्याला गारीगार करायची युगत सद्याला चांगली गावलेली. पोर टोरं त्याचं ऐकत राह्यचीं. चौकोनी चेहरं नि वटवटीत डोळे करून!

चित्र बघितल्यावर सद्या म्हणाला तें म्हाद्याला आठवलं.

'हाट् लेका, फुक्कट जलम तुजा! इवडं कळत न्हाई—असं म्हणून सपाट्यालाच सद्यानं म्हाद्याला भुईसपाट केलं. तो पुढं म्हणाला, 'येकदा मी कोलापुरला भावजीकडं ग्येलो व्हतो,' सद्या शब्दांचा मोहर फुलवायला लागला, 'भावजींनीं एक दिवस मला शनिमा बगायला नेलत. विंग्रजी शनिमा हुता. सारी सायब, सायब्या-मडमिणी....झग्यांतल्या शनिमांत किना सायबं सायब्यांस्नी गपागप धरत हुती नि मटामट मुकं घेत होती-गंमतच! राव, लई मजा आली!' उगाच लांबडं न लावतां नेमकंच तेवढं सांगायची त्याची बोलण्यांतली खुबी. ऐकणाऱ्यावर त्याचा बराबर परिणाम व्हायचा. सद्या नेमकं तेंच सांगून मोकळा झाला.

'म्हंजी रे काय?' म्हाद्या भारल्यासारखा झाला होता.

'हाट लेका, इवड कळत नाय? तुजी आय गोंयाचा कंदी मुका घ्येती कीं नाय,... तसं तसं मोठ्या बाप्यानं मोठ्या बायलीचा घ्येतलेला मुका–'

'इचि भनं! गंमतच!—'

'–आनि फुडं गंमत सांगतु तुला....आमी शनिमास्नं घरामंदी आलु नि भावजींनीं आकाला जवळ वडली आनि शनिमांतल्यासारका तिचा मुका घ्येतला...आका धडपडली...गंमतच वाटली...'आणि सद्या खो खो हसला. म्हाद्या ऑ करून गुमानच बसला. दडपल्यावाणी.

'गंमतच हाय म्हन की!' थोड्या वेळानं दकल पडल्यावाणी म्हाद्या म्हणाला.

'आलं, का टक्कुऱ्यांत? कललं?...अरं, चित्तरांतला तो सायब आपल्या सायबिणीचा मुका घेतुया......'

•'आरंच्या!' म्हाद्या चित्राकडं बटबटीत डोळ्यांनीं पहात होता.

ही गोष्ट म्हाद्याच्या मनांत घर करून राहिली होती. 'च्यायला! गंमतच!! तो मनाशीं म्हणाला.—आणि तोंडांत बोटं घालून मग चहूदिशी बोटांनीं त्यानं चिठकी वाजवली. उठून उभा राहिला. लंगुटीचा शेव खेचून ठाकठीक केला.

आठवणींनीं त्याचं मन जड झालं. आणखी एका गोष्टीचा त्याला आठव झाला. उगाचच. सद्या म्हाद्या विहिरीच्या काटाला ऊंस फोडत बसलेले होते. म्होरं चोयांचा ढीग पडलेला होता. तोंडानं 'स्–स्' आवाज चालला होता. हातां-तोंडावरनं रस ओघळत होता. आणि त्यासंगं गप्पाहि.—

'काय लेका, तुजी किशी!'

'काय झालं र?'

'शेंबडी–लेंबडी शीः! त्या डोचकभर झिपऱ्या,...कंदी अंगावरचं कपडं धुतलेलं असत्यात की नसतात कुना ठाव! म्हयन्या–म्हयन्यांतनं अंगुळ बी नसल! शीः लेका घान!!—घाननाच्या पोरी बग कशा असत्याती!—'

म्हाद्यानं गुमान ऐकून घेतलं. बोलला नाहीं.

'—आणि म्हनं बायकु तुजी ती! अशी बायकु? यॉक!!'

तरीहि म्हाद्या गप्पच बसला. मनांत तो काय म्हणाला असेल कुणास ठाऊक!

लगोलग कुठं दडून बसलेली आणखी एक आठवण त्याला आली.

मोटवणावर म्हाद्या कपडं धूत बसलेला होता. किशी विहिरींत डुंबत होती. म्हसरं इकडं तिकडं सावलींत बसून संथपणं रवंथ करीत होतीं. ऊनबी तापलेलं. पाण्यांत डुंबायला लई मजा! कपड्यास्नी साबण लावून म्हाद्या फेस जमवत होता. कपडं बडवत होता. तो फेस, तें पाणी, कपड्यांचा स्वच्छपणा!

—त्याला त्याची गंमत वाटली. साबणाच्या एवढ्याशा वडींतनं इतका भला फेस कसा येतो याचं तो मनाशीं आश्चर्य करीत होता. पाण्यांत बुडल्यावाणी तो असा विचारांत बुडाला असतांना किशी समोर येऊन उभी राहिली. त्याची त्याला दकल आली नाहीं. तिनं त्याच्या अंगावर पाणी उडवलं. तो दचकला. त्यानं तिच्याकडं पाहिलं. किशी हसली. तो हसला.

किशीनं अंगांतलं परकर–पोलकं काढलं, त्याच्यापुढं फेकलं. म्हणाली, 'येलाबी येवडसं साबन लाव—'

'–आनि बडव—'

किशी उघडी. अंगांतनं पाणी निथळत होतं. अंग स्वच्छ, हात लावून पहाण्यासारखं झालं होतं. म्हाद्या किशीकडं पाहत राहिला. किशीचं हें स्वरूप त्याला नवं होतं. त्यानं तिला कधीं उघडी पाहिली नव्हती. तिच्या

# दोन कविता—



## सोसवेना आतां...

तुझें सख्व सारें
माझीया हातांत
अमृताची धार
माझ्या खांद्यावर
सजवली त्यांची
पुसलीस पानें
त्यांच्या देवळाला
दारची तुळस
छाया त्यांच्यासाठीं
अखंड हा शाप
त्यांच्यासाठीं होसी
कधीं ना निर्झर
काय कमी केलें
दिलें दवडोनी
उपेक्षेचा भार
घेई प्राणनाथा

त्यांच्या पदरांत
फोलपट
त्यांना डोईभर
रक्तव्रण
सोंगें आवडीनें
माझ्या मुखां.
सोन्याचे कळस
न शिंपली
काय माझें पाप
पोळण्याचा
मत्त महापूर
माझ्यास्तव
रोप हा म्हणोनी
वाळवंटी
सोसवेना आतां
गाभाऱ्यांत

## शपथ गळ्याची

शपथ गळ्याची 'शप्पत शप्पत'
आज घेतसे, काल घेतली
उद्यां उगवता फिरून घेईन
शपथेखातर पडले गुंतुन
शिणलेल्या स्वप्नांची 'शप्पत'
भिजलेल्या पदराची 'शप्पत'
विव्हळत्या हृदयाची 'शप्पत'
गरगरल्या धरतीची 'शप्पत'
कुठली कुठली घेऊं शप्पत
कितीकदा अन् राहूं योजत
जगावेगळी एकच शप्पत
शपथ गळ्याची 'शप्पत शप्पत'

—शिरीष पै

उघड्या शरीराकडं पाहात रहावं असं त्याला निष्पापणं वाटलं. आपण उघडी आहों, आणि म्हाद्या आपल्याकडं रोखून बघतोय हें तिच्या मनांत देखील आलं नाहीं. यांत दोघां-कडून कांहीं तरी विपरीत अनिष्ट घडत आहे याची त्यांना जाणीवच नव्हती. असली कसली जाणीव त्यांच्या मनांत अद्याप उगवलीच नव्हती.

म्हाद्याच्या मनांत आलं,—लई ब्येस हाय, झ्याक हाय माजी किशी! सद्याला काई कळतच नाय. तिला शेंबडी लेंबडी म्हनतुया बग जरा यिऊन म्हजे कळेल् माजी किशी कशी हाये ती! शीः करतुया! लई श्येना समजतुया लेकाचा सोताला—हाट् लेका! कायबी कलत नाय तुला......' आणि म्हाद्या असं मनाशीं म्हणून आपल्याशींच हेटाळणीच्या सुरांत सद्याला हंसला.

आणि एकाएकीं त्याला भान आलं, की आपण एकटे आहोंत. त्याला मरगळल्या-सारखं झालं. झाडावरचं फूल सुकून त्यानं मान टाकावी तसं त्याला झालं. सद्याची, किशीची वाट बघून बघून तो कंटा-ळला होता. 'सद्या येक न्हाऊं दे, किशीनं तरी बिगी यावं की न्हाई—' असं तो मनाशीं म्हणाला असेल नसेल तों त्याच्या तोंडांतनं शद्व बाहेर पडले, 'ची भनं!—आनि इदूळ कुनी बी नाय!—म्हंजी काय!' त्याच्या जिवाला एकसरशी किक् आली आणि त्या भरांत म्हसरं हाकायची काठी त्यानं जमिनीवर साप-दिशी हापटली. उठला नि झोंपत चालल्या-वाणी शेताकडं जायला निघाला.

अंगांत झ्याक् कळीदार पैरण, डोक्याला तुरेदार मुंडासं, कंबरला चुणीदार धोतर कसलेलं, ओठावर पिळदार मिशा, गळ्यांत मारुतीची पेटी. पैरणींत गोटीबाज दंड नि भरदार छाताडा दडलेलं. मांड्या घाटदार. म्हाद्याचं सारं शरीरच घोटीव.—आणि त्याचं अंग, अंगावरचीं कापडं आखाड्यांतल्या मातीनं लालीलाल झालेलीं. अशा ऐटींत म्हाद्या शेताच्या बांधावर किशीची वाट बघत उभा राहिलेला होता. टाचा उंचावून, डोळ्यावर तळ हाताची सावली धरून दूरवर न्याहळून पाहत होती. पण तिचा पत्त्याच नाहीं. मनांत किशीच्या नांवानं शिव्या मोजीत होता. आंतनं खवळून उठला होता. आणि त्या शिव्या ओठांतनं बुडबुडत होत्या.

'आली वाटतं!' म्हाद्या मधीच मनाशीं पुटपुटला. किशी येत होती. त्यानं तिला हाळी घातली, 'एऽऽ कारबारनीऽ! ये की बिगी बिगी, उचल पाय, किती बगूं वाट तरी—'

आले व ऽऽआले धनी! इत्का जीव सोडाया काय जालं? कसली तान लागलीया माजी!' आणि किशी पळायला लागली. म्हाद्या बघतच राहिला.

किशी कशी सारीकडनं भरलेली होती. टासटोस. भरदार अवयवांना शरीर पुरत नव्हतं.—गळ्यांत चिताक, पुतळ्यांची माळ, कानांत झुलतीं बुगं, पायांत घणसर साखळ्या आणि बोटांत पेढेमाटाचीं हीं मोटीं जोडवीं; दंडांत वाकड्या रुतलल्या,—आणि डोक्यावर पाटी घेऊन किशी पळत होती. म्हाद्याला ती लई मस्त वाटली. पाहत राहिला. जीव येडा झाला.——मग रक्त उसळायला काय उशीर! पेटलाच आंतनं.

'यिऊ दे तरी,........अशी.........'

आणि एकाएकीं त्याला ध्यान आलं. जाग आली......एकटं असल्याची!—'आरीच्या ची भनं ग्येली कुटं किशी? आत्तां पळत पळत हतं जवळ आली हुती,......किती मोटी हुती!—ऑं! गंमतच हाय की!...... अरच्च्या, आनि मीबी हाये तेवड्याच? मोट्टा म्हाद्या ग्येला कुटं?'......

म्हाद्या मनांतनं उसळला.—खवळला. समुद्रासारखा; माळावरल्या वावटळीसारखा. 'यिऊं दे तरी आतां किशी, उशीरा का हुईना यीलच, तवा अशी धरतो आनि......

मनांत बोलत होता तें तिथंच राहिलं, नसलेल्या मिशीवरनं फिरणारा हात तिथंच अडखळला. थांबला. हातांतलं चित्र थरथरलं चित्राकडं अनिमिष पाहणारी नजर धडपडली

'म्हादाऽऽ!'

'कीऽ शेऽ!'

त्यानं इकडं तिकडं पाह्यलं. त्याला किशी कुठंच दिसली नाहीं. मन विस्कटून गेलं. घडी बिघडली. माहीत नव्हता असला राग आला. 'च्यायची किशी!' त्यानं मनाशीं जोरांत शिवी हासडली...कुतूहलपूर्ण नजरेनं निरखून पाहत होता, पाहून मनाशीं कल्पनांचे डोंगर रचत होता, त्या हातांतल्या चित्राचे कपटे कपटे, चिंध्या चिंध्या केल्या....आणि ते कपटे त्यानं रागानं इतक्या जोरानं हापटले की, जमीन दुभंगून जावी!!

—आणि त्या भरांतच कपटे पडल्या जागेवर तो पाचूदिशी थुंकला!

पान १० वरून...

पुस्तकें हें त्यांचें व्यसन होतें. घरीं आलेल्या एकाद्या अडाण्याला आमचें घर म्हणजे लायब्ररी वाटे. तसें कुणीं विचारलें कीं भाऊसाहेब नुसते हसत. अशा वेळीं आम्हांला फार राग येई. रागांत मी म्हणे, 'नुसते हसलांत काय ? सणकवायला हवं होतं तुम्हीं त्याला.' 'अग हो हो किती रागावशील ! ग्रंथपालच होतो मी.'

खरं होतें. भाऊसाहेबांनीं आयुष्याची सुरुवात लायब्रेरियन म्हणूनच केली होती. पुस्तकाचें आणि त्यांचा संग्रह करण्याचें महत्त्व ह्याच ठिकाणीं त्याना समजलें असावें. कारण लायब्रेरियन म्हणून काम करीत असतांना पुस्तकांशीं झालेल्या परिचयाचें ऋण ते नेहमीं मान्य करीत.

पुढें त्यांनीं वकिलीला सुरुवात केली. पण चरितार्थाचें एक साधन ह्या पलिकडे त्यांनीं वकिलीला कधीं महत्त्व दिलें नाहीं. सकाळीं नऊच्या आंत घरीं आलेल्या पक्षकाराला ते कधीं भेटत नसत. भाऊसाहेबांच्या सवडीप्रमाणें पक्षकारांना भेटावें लागे आणि इतर वेळीं 'वकिलसाहेब घरांत नाहींत' हें ठराविक वाक्य ऐकावें लागे.

'वकिलसाहेब घरांत नाहींत असें आम्हीं पक्षकारांना सांगत असू त्यावेळीं भाऊसाहेब चौथ्या मजल्यावरच्या त्यांच्या खोलींत टेबलावर पुस्तकें पसरून, आपल्या वळणदार अक्षरांत नोटस् काढण्यांत दंग असत; तर कधीं संस्कृत पंडित त्यांना शिकवायला आलेला असे, कधीं दुर्मिळ नाण्यावरची भाषा वाचण्याचें काम चालू असे, तर कधीं डॉ. दिक्षितांबरोबर चर्चा चालू असे.

दरवर्षीं ख्रिसमसच्या सुट्टींत भाऊसाहेब प्रवासाला बाहेर पडत. पेशावरपासून कन्याकुमारीपर्यंत ते सगळीकडे फिरले होते. ठिकठिकाणाचे चित्रसंग्रह, वास्तुशिल्पें, ऐतिहासिक स्थळें ह्या सगळ्या गोष्टींचें त्यांनीं सूक्ष्मपणें अवलोकन केलें होतें. ठिकठिकाणचीं लेणीं त्यांनीं पुनःपुनः पाहिलीं होतीं. त्यांचे फोटो घेतले होते, स्केचेस् तयार केलीं होतीं. त्यांनी केलेलीं मूर्तींची तपशीलवार वर्णनें वाचलीं कीं वाटतें, ह्या लेण्यांतील मूर्ति सजीव होऊन त्यांना भेटल्या कीं काय?

प्रवासाहून परत आलेल्या त्यांच्या सामानांत काय काय मिळेल त्याचा भरवंसा नसे. दुर्मिळ नाणीं, तांब्या-पितळेच्या मूर्ति, उत्खननाच्या ठिकाणीं मिळालेले खापरीचे तुकडे, नकाशे आणि पुस्तकें. त्याबरोबरच वांगी, कलिंगड किंवा गुलाबाचीं रोपेंसुद्धां.

भाऊसाहेब विद्वान होते, पण विद्वज्जड नव्हते. जितके विद्वान होते, तितकेच रसिक होते. त्यांच्या स्वभावाचें यथार्थ वर्णन करावयाचें झालें तर 'तुझें आहे तुजपाशीं' मधील काकाजींकडे मी बोट दाखवीन. आंत एक बाहेर एक असे ते कधींच वागले नाहींत त्यांचा सर्व व्यवहार खुला होता.

लिहितां लिहितां त्यांच्या मनाच्या खंबीरपणाची आठवण झाली म्हणून सांगतें. गांधीवधाच्या दुसऱ्या दिवशींची गोष्ट. खवळलेले लोक मिरवणुकीनें रस्त्यावरून जात होते. आम्हीं ज्या ठिकाणीं रहात होतों त्या ठिकाणीं ब्राह्मणाचें असें आमचेंच घर होतें. मिरवणुकींतलें कुणीतरी ओरडलें, 'पेटवा—' आणि रस्त्यावरून जाणाऱ्या लोकांची झुंड एकदम आमच्या घराकडे वळली. भाऊसाहेब गॅलरींत उभे होते. तिथल्या तिथें दंड थोपटून त्यांनीं आव्हान दिलें. 'असेल हिंमत तर या वर' डरतो कीं काय ? दोघां-चौघांना लोळवल्याखेरीज घर जाळूं देणार नाहीं ' त्या दिवशीं रात्रभर घरांतील परशू, कुऱ्हाड व तलवार यांना ते धार लावत बसले होते.

पण माधव गेला आणि त्यांच्या मनाचा हा खंबीरपणा लोप पावूं लागला. पूर्वीच्या भाऊसाहेबांना आम्हीं हरवून बसलों. शांताबाईसाठीं ते हंसून-खेळून वागत पण त्यांत जीव नव्हता. नव्या जागेंत येऊन जरा स्थिरस्थावर होतें न होतें तोंच त्यांना अर्धांगवायूचा अटॅक आला. आणि तिथून पुढें कधीं मुंबईला माझ्याकडे, कधीं बडोद्याला ताईकडे, कधीं पुण्यांत असें सुरूं झालें. आजारीपणांतून जरा बरे होतात न होतात तोंच पानशेतचा फटका बसला. आयुष्यभर जमविलेल्या पुस्तकांचा, संसाराचा आणि सुंदर सुंदर वस्तूंचा सगळ्या सगळ्याचा डोळ्यादेखत नाश झाला. पुस्तकें गेल्याचें दुःख पचवणें कठीण गेलें. त्यांच्या आयुष्याला चमत्कारिक रितेपणा आला.

मन पुनः पालवूं लागले ते सुनेला, आशाला दिवस गेल्याचें ऐकल्यापासून. तेवढ्यासाठीं ते ऑगस्टमध्यें फैजाबादला बंडाकडे गेले. तिथें मन रमूं लागलें. डिसेंबरमध्यें बंडाला मुलगा झाला. नातवाला पहाण्यासाठीं ते मुद्दाम लखनौला गेले. २६ जानेवारीला बारसें करावयाचें असें ठरलें. बारशासाठीं २५ तारखेला फैजाबादहून लखनौला जायचें आणि बारसें आटोपून २९ तारखेला पुण्याला यायला निघायचें...सगळे ठरलें होतें. १९ तारखेची तिकिटेंसुद्धां काढून झालीं होतीं.

किती विचित्र योगायोग ! ज्या दिवशीं ते लखनौला जायला निघणार होते त्या दिवशीं त्यांना हॉस्पिटलमध्यें नेण्यांत आलें आणि ज्या दिवशीं ते पुण्याला यायला निघणार होते त्याच दिवशीं...

आतां आठवणी राहिल्या आहेत. • पावलो पावली येणाऱ्या आठवणी--

## तीन शृंगारिका–

### ----आरती----

• ओघळती गंधधारा
 सुवासली मानी
 तुझे हात माझ्या हातीं...
पाऱ्यातुन सांज ढळे
 झिम्मा सावल्यांचा
 आहे शेजार नभाचा
न्याहाळित प्रतिबिंबें
 नको जाऊं दूर...
 हवें तेवढें अंतर !
काळ्या मेघमाला आल्या—
 उतरून खालीं:
 माझी लपेट सांचली
ओघळती गंधधारा
 सुवासली मानी:
 प्राण गातात आरती

### ----जाग----

दिवा जळतोच आहे
 नाहीं वाऱ्यालाहि जाग:
तुझ्या ओठांनी पेरली
 ऊन अमृताची आग
अजूनहि काळोखाला
 येतो केसांचा सुगंध:
चुक्या पांखरांच्यापरी
 डोळ्यांतील फिरे धुंद
हाट दिशांचे पालथे
 अशा आगीसाठीं केलें
...जाग येईना वाऱ्याला
 किती मोजावी पावलें

### ----चंद्र----

प्रकाश झाडांतुन ओघळतो
 पान पान थरथरतें:
सुगंधशांती वाट कुणाची
 चंद्रजलानें भरतें
पैंजण घुमवित शीतल वारा
 मेघ मेघ थबथबला
ओठांवरल्या चंद्रमधाचा
 थेंब कुणीसा टिपला
गदगद गदगद अवकाश जरासें
 भिडलें तव डोळ्यांशीं !
चंद्रकरांनीं मिठी सुगंधित
 चंद्रच तव वक्षाशीं !

—केशव मेश्राम

# व्हेनिसचें द्विवार्षिक कलाप्रदर्शन

# VENICE BIENNALE



—चित्रकार—
माधव सातवळेकर

व्हेनिसमध्यें होणारें द्विवार्षिक प्रदर्शन हें एक कलेच्या वावर्तांत मोठें जागतिक आकर्षण आहे. निरनिराळ्या देशांतून अधिकृतरीत्या उत्तमोत्तम चित्रें व शिल्पें येथें पाठविलीं जातात व त्यावरून सध्याच्या कलेचें मोजमाप ठरवलें जातें.

व्हेनिससारख्या सुंदर आणि प्राचीन शहरांमध्यें हें प्रदर्शन भरविण्यांत फार औचित्य साधलें आहे. गेल्या पांचशें वर्षांत तेथें कांहीं फारसा फरक झालेला नाहीं असें म्हणतात. ज्या राजवाड्यांतून, रस्त्यांवरून व चौकांतून टिशीयन, व्हेल-स्केझ, रुबेन्स वगैरे प्रसिद्ध चित्रकार वावरले तेच वातावरण, तीच घरें, राजवाडे व चौक अद्याप जसेच्या तसे आहेत; त्यामुळें व्हेनिसमध्यें लहान होडग्यांतून ( Gondolas ) शिरल्यावरोबर एका स्वप्नमय सृष्टींत शिरल्यासारखें वाटतें. दुरूनच ते सेंट मार्कच्या चर्चचें सोनेरी घुमट दिसूं लागतात— नंतर गुलाबी रंगाचा ढूकल राजवाडा दिसतो. तेथून तसेंच ग्युदेका कॅनॉलमधून पुढें लीडो बेटाच्या बाजूनें गेलें, कीं ह्या प्रदर्शनाची रम्य जागा दिसूं लागतें.

★



निरनिराळे कातड्याचे तुकडे चिकटवून केलेली 'हिप्पो'ची कलाकृति.

★

समुद्रकांठच्या एका विस्तीर्ण उपवनामध्यें लहान लहान पण टुमदार असे प्रत्येक राष्ट्राचे स्वतंत्र पॅव्हिलियनस् बांधलेले आहेत. गेल्या-बरोबर डाव्या हाताला स्पेनचा पॅव्हिलियन लागतो. मग बेल्जीयम, हॉलंड हे देश दिसतात. समोरच्या बाजूला एक मोठी गॅलरीवजा इमारत आहे, ती इटलीची आहे. नंतर इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, रशिया वगैरे देशांचें प्रासाद लागतात. हिंदुस्थान, इराण, इजित आदी देशांचीं मात्र स्वतंत्र प्रदर्शनें नसून एकाच मोठ्या गॅलरींत लहान लहान खोल्यांमध्यें त्यांच्या कलाकृती टांगलेल्या दिसतात. सर्व वातावरण मोठें प्रसन्न आणि कलेला पोषक असें वाटतें यांत शंका नाहीं.

प्रदर्शनं दर दोन वर्षांनीं भरतें व तें ३ महिने उघडे असतें. चित्रें पहाण्यासाठीं व विकत घेण्यासाटीं जगांतून निरनिराळ्या देशांचे प्रवासी येत असतात. त्यामुळें व्हेनिसच्या आकर्षक वातावरणांत आणखी भर पडते. या वर्षांचें प्रदर्शन ३१ वें आहे. जगांत होणाऱ्या आंतरराष्ट्रीय प्रदर्शनांमध्यें या प्रदर्शनाचा मान सर्वप्रथम मानला जातो. यांत प्रथम श्रेणीचें बक्षीस मिळविणें फार मानाचें आहे. पिकासो, ब्राक, डयूफी, मातीस वगैरे जगप्रसिद्ध चित्रकारांना येथें पूर्वीं बक्षिसें मिळालेलीं आहेत. म्हणून मी मोठ्या उत्सुकतेनें तें पहायला गेलों होतों. २०–२२ वर्षांपूर्वीं ह्याच टिकाणीं प्रदर्शन पहायला आल्याची आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं.

★

एक 'काष्ठ' शिल्प.

★



प्रदर्शनांत एकूण तीन हजारावर कलाकृती टेवलेल्या होत्या. ३३ देशांनी त्यांत भाग घेतला होता. या वर्षीचें प्रमुख आंतरराष्ट्रीय पारितोषक मानेसियर(Manessier) या तरुण फ्रेंच चित्रकाराला मिळालें आणि शिल्पाचें मुख्य बक्षीस जियोकोमेत्ती ( Giocometti ) या स्विस शिल्पकाराला मिळालें. बाकीचीं बक्षिसें ग्रेट ब्रिटन(डालवुड), इटली ( भापोग्रासी व मार्लोत्ती ), जपान, अर्जेंटिना वगैरे देशांतील कलावंतांना देण्यांत आलीं.

★

कॅनव्हासवर अशीं भोकें पाडून केलेली एक कलाकृति.



★

हें प्रदर्शन आजकालच्या जागतिक कलेचें निदर्शक आहे. आजचा विचारप्रवाह कोणत्या दिशेनें वाहात आहे हें येथें स्पष्ट दिसून येतें. आधुनिक चित्रकलेचें व शिल्पांच्या बहुविध प्रकाशांत होणारें दर्शन घेऊन झाल्यावर मनांत विचार येतो कीं ही कला कोठें जाणार आहे ? प्रत्येक चित्रकार वैयक्तिक वैशिष्ट्याला वाव देण्यासाठीं किंवा वेगळें वैशिष्ट्य दाखवण्यासाटीं ज्या नाना प्रकारच्या कल्पना योजतो–तें पाहून मन खरोखरीच बावरून जातें ! !

आज नुसत्या abstract art वर समाधान फार थोड्यांचें होतें. त्यांत निरनिराळे Texture योजून त्याला Sculptural वा Architectural स्वरूप देण्याचा प्रयत्न दिसून येतो. चित्रकला ही नुसती कागद किंवा कॅन्व्हासवर Flat न रहाता शिल्पासारखी दिसण्याचा प्रयत्न करीत आहे व शिल्पकला भरीव ( Round form ) न ठेवतां flat दिसण्याचा प्रयत्न करीत आहे ! शिवाय आजच्याइतके स्वातंत्र्य कलानिर्मितींत कधीं नव्हतें. चित्रामध्यें काहींही व्यक्त न करण्याच्या स्वातंत्र्यापासून तें दुसऱ्याच्या चित्रांची नक्कल करण्यापर्यंत सर्व स्वातंत्र्यान्चे

...पान ५८ वर





अनुक्रमणिका




*समोरच्या फणसावर एक कावळा रोज माझ्यासमोर येऊन बसतो. मान वाकडी करून माझ्याकडं बघत राहतो. त्या कावळ्याकडे बघून कसं बरं वाटतं. बोलत नाहीं, उगाच काव काव नाहीं. तो माझ्याकडे मी त्याच्याकडे बघतों.*

सकाळीं सात वाजतां इडली खाऊन मी या खिडकीसमोर येऊन बसलों आहे. आतां दहा वाजले. मी एकदांहि उटलो नाहीं. या कॉलनींतले इडली खाणारे सगळे लोक कॉफी पितात. कपबशी नको, स्टेनलेसचं भांडं नको, पितळीच्या फुलपात्रांतून कॉफी प्यायची. आम्ही लहानपणीं दररोज तशी कॉफी पीत होतों. बायको तिच्या घरीं मात्र चहा करते. म्हणते मला चहा पाहिजे. कमीला चहाच आवडतो, रघु चहाच मागतो. मागणारच ! मुलांना काय जशी संवय लावावी तशी लागते. मग चहा, कॉफी दोन दोन करायचा कशाला त्रास दररोज सकाळीं ! सगळ्यांना चहा केला कीं झालं. आम्हीं पितो तेंच तुम्ही प्या. म्हणून मलासुद्धां बायको चहा देते—गेलीं पंधरा वर्षं.

ती बघा आली—खोलींत यायला घाबरते आहे. ती म्हणजे आमची भार्या, पत्नी, कलत्र, काय म्हणाल तें. हळूच दारांतून डोकावून जाते. मधुनमधून मला खिडकीच्या काचेवर तिची सावली हालतांना दिसते. मुद्दाम अर्धी खिडकी बंद ठेवून बसलो मी. तिला दिसते माझी पाठ. जसा एकदां बसलों, तसाच बसून आहे. मुळींच उठणार नाहीं, वाटेल तितक्या फेऱ्या मारून जाऊं दे.

आज सुधाकर येणार असं काल रघु म्हणत होता. मला कोणी कांहीं सांगत सुद्धां नाहींत. सुधाकर आला तर मी काय ट्रंक उचलून फेंकून देणार ? माझाच तो चुलतभाऊ. पण हिचा त्याच्यावर विश्वास आहे, तेव्हां तिला वाटतं तो माझा वैरी झाला. माझ्याच आईनें त्याला लहानाचा मोठा केला. आतां तो बडा माणूस झाला, खूप पैसे मिळवितो, म्हणून लहानपणीं मांडीला मांडी लावून रोज शाळेंत जातांना पेज खाल्ली, तें कसें विसरणार. येऊं दे बापडा—सुधाकरला आण, विभाकरला आण आणखी एका पद्माकरला आणलास तरी मी या खुर्चींत असाच बसून राहणार. अजिबात हलणार नाहीं. स्वर्गांतून तुझे पितर खाली उतरले तरी मला खुर्चींतून उठवतील का बघूं या.

आतां पुन्हां काचेवर तिची सावली हलली. नवऱ्याची काळजी लागली आहे तिला. फक्त दोन महिने झाले. मला अधिक अधिक घाबरते आहे. आधीं पंधरा वर्षं हीच आमच्या घरांत नवरा, मी बाईमाणूस असल्यासारखा हिला घाबरून दीनवाणा. माझ्या आईनें पांचशें रुपये मागितले एकदा. आई किती असतात प्रत्ये-काला—एकच ना ? त्याच आईनें मागितले. माझा पगार तसा जास्त नाहीं, अगदीं खरी गोष्ट, पांचशे रुपये साठवायचे म्हणजे कधीं वर्ष, कधीं दोन वर्षं लागतात—कबूल; पण मीच नोकरी करीत होतो, हिनें तोंडपाटिलकी पुष्कळ केली, कधीं दिडकी मात्र मिळवली नाहीं. बापाकडून आणली नाहीं...माझ्या आईनें तरी का मागितलं ? गोपिकेचा नवरा वारला आणि तिला चार मुलं. गोपिका तेवढी एकच माझी बहिण जिवंत आहे. बाकी सगळ्या गेल्या. त्या सुटल्या. त्यांचे नवरे मरून त्यांचीं मुलं 'मामा मामा' करायला नाहींत कोणी.

आई म्हणाली, गोपिकेच्या मोठ्या दोन मुलांना तुझ्याकडे शिक्षणासाठीं पाठवते, दोन आमच्या जवळ गांवी रहातील. बायको म्हणाली, साफ नाहीं ठेवून घेणार. गोपिकेचं लग्न तुम-च्याच पगारांतून केलं. तिला चार मुलं झालींच कशाला इतक्यांत ? नवऱ्यानें पोरांना उघड्यावर टाकलं, स्वतः मरून गेला. त्याचे भाऊ बघतील काय तें. उद्यां तुम्हांला काय झालं तर माझ्या मुलांनीं काय करायचं ?

ते पांचशे रुपये आईनें मागितले तेव्हां पाठवले नाहींत. गोपिकेचीं दोन मोठीं मुलं





अनुक्रमणिका

एका आश्रमांत कोणी ठेवली. माझाच भाचा, माझीच भाची. मामा मामा करून लाडीगोडी करायचीं, तीं रत्नासारखी मुलं आतां एका आश्रमांत वाढतात. हिनें अडीचशें रुपयांचं एक मशीन घेतलं, नंतर अडीचशें रुपये देऊन एक रेडिओ घेतला. मशीनवर बसून फराफरा कपडे शिवते. तेवढाच शिंप्याचा खर्च वाचला म्हणते. माझे शर्ट तीच शिवते. पॅंट अजून शिवायला येत नाहीं, म्हणून बरं. रेडिओ घेऊन काय काटकसर केली या बाईनें ? ती म्हणे एक हौस तिची. कमीला गाणं चागलं येतं, म्हणून रेडिओंतलं गाणं तिला ऐकायलं हवं...वारे कमीचं गाणं—हा कावळासुद्धां गाणं सुरूं झालं कीं उडून जातो.

बायकोला कांहीं करायचं असलं म्हणजे एक हजार कारणं मिळतात. मला कांहीं करायचं असलं, तर तें कां करूं नये यासाटीं देखील तिच्याकडे दोन हजार कारणं असतात. अगदीं तयार, पटापट पटापट बाहेर आणते.

आमची आई आतां मरून गेली. मी गावीं जाऊन पोंचलों तेव्हां ती शुद्धीवरसुद्धां नव्हती. गोपिकेनेच सगळं केलं. आईला इकडे आणली नाहीं, हॉस्पिटलात ठेवली नाहीं, घरीं तिचं दुखणं काढलं नाहीं. जन्मभर जिथें रात्र रात्र राबली, तिथें कष्टानंच वारली. मी एकुलता एक मुलगा, नवससायास करून झालेला. तिच्याकडून मी घे घे घेतलेलं. स्वतःच्या पायांवर उभं राहून दोनाचे चार हात होईपर्यंत आईकडून अन्न घेतलं, श्रम घेतले. माया घेतली आणि तिनें सबंध जन्मांत एकदाच, फक्त एकदांच हो मला पांचशे रुपये पाठव म्हणून मागितले, ते सुद्धां मी दिले नाहींत. तिला...मला रडूं सुद्धा येईना. आमच्या गावात सगळे म्हणाले, माईचा बाबू मात्र अगदीं उलट्या काळजाचा निघाला. काळीज उलटं व्हायला आहे तरी का जाग्यावर ? माझं काळीज हिनें कोळिष्टकासारखं कुठें झटकून टाकलं देवजाणे. हिचंच काळीज मी वापरतों. बुद्धि तिची, चालतो मी, ती सागेल तसं एक दो एक दो करीत.

समोरच्या फणसावर एक कावळा रोज माझ्यासमोर येऊन बसतो. मान वाकडी करून माझ्याकडं बघत राहतो. त्या कावळ्याकडे बघून कसं बरं वाटतं. बोलत नाहीं, उगाच काव काव काव नाहीं. तो माझ्याकडे बघतो, मी त्याच्याकडे बघतो.

ती बघा, पुन्हा सांवली हालली. ही आतां दिसली ती रघूची सांवली. आतां मुलंसुद्धां घाबरतात मला. मी जवळपास दिसलों, कीं कमी अंगावर पदर नीट घेते, पाय आवरून बसते. नाहींतर पूर्वीं काय वागायची. मी सांगितलं बायकोला, ही मुलगी तुझ्या तोंडाला काळं फासणार. बायको चिडली. तुम्हांला गोपिकेची मुलगीच आवडते, स्वतःच्या मुलीची किंमत नाहीं, आजकाल जगांत लोक कसं वागतात तें माहीत नाहीं...रघूसुद्धां नापास झाला. कारण तुम्ही त्याच्या अभ्यासाकडे बघत नाहीं, असं खूप खूप बोलली. तिच्या बोलण्याचं मशीन एकदां सुरूं झालं कीं फॅक्टरींतला आवाज बरा असं वाटतं मला. रघूला शिकवायला मी पाहिजे, आणि ही मला शिकवणार. त्यापेक्षां हिनेंच रघूला का शिकवूं नये असं उलटून उत्तर कोणी द्यावं ? आतां इकडे बसलों म्हणजे मलासुद्धां पुष्कळ चांगलीं चांगलीं उत्तरं सुचतात, पण तीं कावळ्याशीं बोलतांना. बायकोशीं आपण एक शब्द उच्चारत नाहीं.

पहिल्यांदा मौनीबुवा, मौनीबुवा म्हणाली. मग सबंध कॉलनींत सांगत सुटली कीं यांना

**—ललित वालावलकर**

फॅक्टरींत काम फार पडतं. काम फार कसलं पडणार, काम करायलाच तर पगार देतात ना ! आई वारल्यानंतर कामावर रुजूं झालों तेव्हां माझं कुठें लक्षच लागेना. आमच्या मॅनेजरला विचारा हवं तर, माझ्यासारखा चोख इसम सबंध फॅक्टरींत दुसरा सापडेल काय. मॅनेजर स्वतः कसं काम करतो तें मला विचारा. आपण एक दिवस लेट गेलो नाहीं, कीं ओव्हरटाईम करायला कुरकूर केली नाहीं.

पण त्यावेळीं गावाहून आलों तेव्हां सारखी ‘ पांचशें रुपये हवें ’ हीच अक्षरं डोळ्यासमोर फिरायला लागलीं. आणि आमची लाल लुगडं नेसणारी डोक्यावरच्या पदराची आई! दुसऱ्याच्या घरीं स्वयंपाकपाणी करून तिनं आम्हाला वाढवलं होतं. वडील वारले तेव्हां आमच्या खेडेगावांत काय हाल हाल झाले आईचे. उद्यां मी मेलों, तर ही माझी बायको आपली तिन्ही गंगावनं सुद्धां टाकून देणार नाहीं. पांचशे रुपये, आईचा फटफटीत सुकलेला चेहरा, पांचशें रुपये, हेंच गोल गोल डोळ्यांसमोर फिरत रहायचं. कसं झालं, त्या एका परमेश्वराला ठाऊक. भलतीकडे पांचशें रुपये लिहून बसलों म्हणे. कुणाचा पै जन्मांत खाल्ली नाहीं. एकदम फॅक्टरीचे पांचशें रुपये खायला मला काय खूळ लागलं होतं ? काय झालं तें ठाऊक नाहीं. पण इकडून प्रश्न, तिकडून प्रश्न, रोज चौकशी, रोज तपासणी-असं मला भंडावून सोडलं सगळ्यांनीं. मी दिला सरळ राजिनामा लिहून आणि घरींच बसलो. मग बायको गेली त्या मॅनेजरचे पाय धरायला आणि आतां पगार आणते खरी. काय रजा दिली आहे मला, कीं कुणी मेहेरबानी केली—आपल्याला कांहीं एक ठाऊक नाहीं. मला पगार हवा तरी कशाला ? माझ्या पोटाला काय लागतं ! सकाळीं इडली असली म्हणजे पुरे. दोन टाईम ताकभात सुद्धां चालतो. त्याला खर्च कितीं येणार हो ? टिचभर पोटासाठीं आपण दुसऱ्यांचे पाय धरणार नाहीं. काय फुकट पगार देत होते ? मर मर जीव तोडून यांचं काम मी करीत होतो. आलेला पगार जात होता बायकोकडे. आज रघूला पेन पाहिजे. उद्यां कमीला पुस्तक पाहिजे, परवां हिला स्वतःला पर्स पाहिजे...पाहिजे, पाहिजे, पाहिजे-पाहिजे फक्त याना. मला कांहींच नको. माझ्या बहिणीला नको, तिच्या मुलांना नको, मला जगांत आणलं त्या आईला कांहीं नको.

तो लांबून टांगा येतांना दिसतो आहे. सुधाकर येत असणार. ही गेली बाई धांवत धांवत पुढें त्याला फाटकाजवळ गाठायला. माझ्याबद्दल एक मोठी स्टोरी सांगायला हवी ना. अहाहा, काय पण ध्यान दिसतं आहे. बटबटीत डोळे, गणपतीसारखे कान, खालचा ओठ सदोदित बाहेर आलेला—कुरकूर करायला कायमचा पुढें ! सुधाकराला पगार चांगला मिळाला तर नवल कसलं ? त्याची बायको आहे सदा शांत, सुखी, तोंडावरचं हंसूं कधीं हालत नाहीं. नवऱ्यानें खरेखुरे पैसे खाल्ले आणि सबंध कॉलनी कुजबुजायला लागली तरी सुधाकरची बायको नेहमीसारखी हंसतमुख दिसेल. नाहींतर आमची ही बघा निघाली तुरुतुरू त्याला भेटायला.

पण मी इथून हलणार नाहीं ! नाहीं, नाहीं, नाहीं. मला डॉक्टर नको, मला औषध नको. मला नोकरी नको, मी कुणाची दिडकी घेतली नाहीं. माझ्या आईला तें पांचशें रुपये आधी नेऊन पोचव. मग करतो सगळं. मग उठेन आंघोळीला. तोंपर्यंत सात सुधाकर आले तरी उठणार नाहीं. इथें असाच खुर्चीत बसणार, आणि समोरच्या कावळ्याशीं बोलणार. फक्त कावळ्याशीं. ●●●



# आतां माझं

युद्धिष्टिरानें आपल्या आयुष्यांत कधीं मागें वळून पाहिलं नाहीं, बेनॉ हा एका अर्थानें ऑस्ट्रेलियन क्रिकेटचा युद्धिष्ठिरच ठरावा; कारण कप्तानपदाची धुरा अंगावर घेतल्यावर बेनॉनें ऑस्ट्रेलियन क्रिकेटला सहसा अपयशाची झळ लागूं दिली नाहीं. नेहमीं यश घेत तो पुढें चालला, क्रिकेटमधला चैतन्य पुरुष म्हणून त्याची झालेली ख्याती क्रिकेट–शौकीन विसरूं शकणार नाहींत. हा हंगामहि आपली 'बेनॉ जिद्द' राखून त्यानें गाजवला. हा असा 'चिरतरुण' क्रिकेट-पटु आतां निवृत्त होत आहे.

बेनॉइतकेच क्रिकेटच्या क्षेत्रांत नांव 'गाजविणारा' खेळाडू म्हणून इंग्लंडच्या 'जिम लेकरचं' नांव घेतां येईल. त्यानें क्रिडांगण 'गाजवलंच' आणि आतां लेखणी कशी 'गाजवली' ते (पहा) वाचा--

नामवंत क्रिकेट खेळाडू निवृत्त झाल्यांनंतर जेव्हां लेखक बनतात तेव्हां तेही क्षेत्र ते आपल्या लिखाणानें गाजवून सोडतात. इंग्लंडचा जिम लेकर हा असाच एक तालेवार लेखक बनला व Over to me सारखं खळबळजनक पुस्तक लिहून बसला! कॉम्प्टनच्या End Of An Innings ह्या पुस्तकानें सुद्धां इंग्लंडमध्यें एवढा गहजब निर्माण केला नव्हता. लेकरनें हें पुस्तक लिहिल्याबरोबर सगळे त्याच्या मागें धांवले, पत्रकार खेळाडू धावले व पोरं–सोरंही धांवली! सगळें लेकरला म्हणाल, 'बाबारे हें काय लिहून बसलास?' खुद्द लॉर्डसचे अधिकारी तर त्याच्यावर इतके रुष्ट झाले कीं 'ओव्हल' मैदानासाठीं विशेष अधिकार असलेला पास त्यांनीं लेकरजवळून काढून घेतला व 'चले जाव!' असं फर्मान त्याच्यावर बजावलं.

ही एवढी खळबळ माजल्यावर लेकरनं ह्या पुस्तकाबाबत पत्रकारांना एक मुलाखत दिली. ही मुलाखत मोठी मनोरंजक आहे. ह्या मुलाखतींत तो म्हणतो, 'मी कोणावरही हल्ला केलेला नाहीं. उलट जें खोटं, दिखाऊ होतं, त्याची मला चीड होती व त्याबाबत मी स्पष्ट लिहिलेलं आहे. माझ्या ह्या लिहिण्यामुळें पुढील पिढीला जर फायदा झाला तर माझ्या लिहिण्याचें सार्थक झालें असं मी म्हणेन.'

लेकर पुढें म्हणतो, 'मी लिहिलेला प्रत्येक शब्द न् शब्द खरा आहे व म्हणून ते शब्द मागे घेण्याचा प्रश्नच येत नाहीं. पुष्कळजण मला विचारतात कीं 'तुला जर पुस्तक लिहायचं होतं तर निवृत्त होईतो तूं कशाला थांबलास?' ह्या प्रश्नाचं उत्तर फार सोपं आहे— खेळाडू म्हणून माझें तोंड अगदीं बांधून टाकलें होतें. टीका करण्याचा माझा अधिकार दडपून टाकण्यांत आला होता. मी होतो तो फक्त क्रिकेट क्लबचा एक नम्र सेवक!'

मग लेकरच्या ह्या पुस्तकांत एवढं आहे तरी काय?

स्वतःची मुस्कटदाबी झाली असं लेकर जे म्हणतो ते पुस्तकाला दिलेल्या नांवावरून तरी खरं वाटतं. लेकरला जणूं काय म्हणायचं आहे– 'इतकें दिवस मानहानी पत्करली. घुम्यासारखा बसून राहिलो, सांगाल त्या दिशेला पूर्व म्हणत आलो. पण आतां मी निवृत्त झालेलो आहे. माझी गेलेली वाचा परत आली आहे. आतां मला बोलूं द्या. पोटभर बोलूं द्या. तुम्हीं नुसतं ऐकत बसा. Over to me. माझी पाळी आहे आतां बोलण्याची!'

हरकत नाहीं. आतां लेकरचं ऐकूं या तर!

सुरुवातीलाच लेकर लिहितो, 'कुठल्या इंग्लिश खेळाडूला ऑस्ट्रेलियाला जायला आवडत नाहीं? नव्हे ऑस्ट्रेलियाला जाण्यासाठीं

अनुक्रमणिका

# ऐका.....!

—दि. श्री. करंदीकर

*दोन-चार बड्या धेंडांची मिरासदारी राखण्या-करितां मी हें पुस्तक लिहिलेलं नाहीं तर अंतरंग कशी चंडाळी चालते ? हें सामान्य माणसाला स्पष्टपणें कळावें म्हणून हें पुस्तक लिहिलेलं आहे. जे खरं आहे, ते खोटं आहे असं लिहूं ? नाहीं ना ? तर मग—*

तो हपापलेला असतो म्हणूनच ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यासाठीं एखाद्या खेळाडूची निवड झाली कीं त्याला अस्मान ठेंगणं वाटतं ! हें सगळं सांगण्याचा खटाटोप एवढ्याच करतां कीं १९५८–५९ च्या ऑस्ट्रेलियांच्या दौऱ्यासाठीं माझी जेव्हां निवड झाली तेव्हां मला हें अगदीं असंसं झालं ! कारण ऑस्ट्रेलियाला मी पहिल्यांदाच जात होतो. पण ह्यापूर्वीं कधीं मी ऑस्ट्रेलियाला कां नाहीं गेलों ? तेच सांगतो आता—

'१९५८ पर्यंत मी ऑफस्पिनर गोलंदाज म्हणून चांगला प्रसिध्द होतो. माझं हें प्रभुत्व खरं पाहिलं तर गेल्या कितीक वर्षांपासून मी टिकवून धरलं होतं. १९५८ साल ! ओफ् ! माझी निवृत्त होण्याची वेळ येऊन ठेपली कीं ! ! पण १९५६ सालीं ऑस्ट्रेलिया विरुध्द इंग्लंडमध्यें खेळताना काहीं 'विकेटस्' घेण्याची मी करामत केली होती. स्पष्टच सांगतो, त्या करामतीच्या जोरावरच १९५८ सालीं मीं माझ्या निवडीची वाट पहात होतो.

'पण थोडें मागें वळून पाहूं या. १९५०–५१ सालीं इंग्लंडचा संघ जेव्हां ऑस्ट्रेलियाला गेला तेव्हां निवड–समितीनें ऑफ स्पिनींगचा सगळा भार १९ वर्षांच्या ब्रिॲन क्लोजवर सोपवला होता. तो म्हणें 'फाईंड' होता ! वास्तविक पहातां त्यावेळी मी फॉर्ममध्यें होतो. कारण त्यावेळच्या हंगामात मीं १६६ बळी घेतले होते व माझी सरासरी १५·३२ अशी होती तर क्लोजनें अवघे वीस बळी घेतले होते व त्याची सरासरी १९·३० अशी होती. पण मला डावलून त्याला नेलें. त्याचा प्रभाव जेव्हां ऑस्ट्रेलियात पडला नाहीं तेव्हां मागाहून मग रॉय टॅटरसल व ब्रिॲन स्टॅथम ह्यांना तेथें पिटाळण्यात आलें.

'ह्यानंतर आला १९५४–५५ चा दौरा. ह्या दौऱ्यासाठीं जिम मॅक्कॉनन ह्याला ऑफ–स्पिन गोलंदाज म्हणून निवडण्यात आलें. ह्याही हंगामात मीच त्याच्यापेक्षा सरस ठरलो होतो. कारण त्याची सरासरी १५.४१ एवढी होती तर माझी १५.१७ होती. !'

लेकर पुढें लिहितो, 'ह्या दोन्हीं दौऱ्यावरून मी एकच निष्कर्ष काढला कीं निवड–समितीला चांगल्या ऑफ्–स्पिन् गोलंदाजाची कदर नाहीं ! पण १९५०–५१ सालीं माझी निवड झाली नाहीं तेव्हां मला अगदीं मनापासून वाईट वाटलं, तें एवढ्याच करतां कीं माझ्या मागून क्रिकेट–क्षेत्रात उतरलेला पोरगेला क्लोज मला वरचढ ठरावा ? कांहीं एक पराक्रम न करतां ? पण त्या दुःखांत सुख म्हणून मला कॉमनवेल्थ संघाबरोबर भारतांत नेण्यांत आलें !'

ह्यानंतर १९५८ च्या हंगामाबाबत लिहितांना लेकर म्हणतो, 'ह्या हंगाम उजाडला आणि वृत्तपत्रांतून एके दिवशीं एकच बातमी प्रामुख्यानें झळकली–'लेकर ऑस्ट्रेलियाला जात नाहीं !' ह्या बातमीनें इतका पेट घेतला कीं गुबी ॲलन ह्या निवड समितीच्या अध्यक्षानें मला ताबडतोब फोन केला व खुलासा विचारला. मी एवढेंच सांगतलें कीं माझ्या मालकानें जर मला रजा दिली तर मी दौऱ्यावर येण्यास केव्हांही तयार आहे.''

पण लेकर हें असं म्हणतोय आणि अशांत तो प्रसंग घडला !

त्याचं असं झालं. क्रिकेटचा तो हंगाम सुरू होता. सरेतर्फे ग्लॅमॉरगॅनविरुद्ध खेळतांना लेकरनें ६३ पटकें टाकली. ह्या थकवा असतांनाच सामना संपल्यावर लेकरला 'ब्लॅकहीथ' येथें जावें लागलें कारण तेथें सरेचा केंट विरुद्ध सामना होणार होता. ह्याही सामन्यात लेकरनें पुन्हां ५४ पटकें टाकलीं आणि दुर्दैव म्हणजे सरे–संघ हा सामना हरला !

येथेंच सगळं बिनसलं !

लेकर लिहितो–'ग्लॅमॉरगॅनच्या' सामन्यानंतर मला आलेल्या थकव्यांत भर म्हणून कीं काय माझ्या हाताचीं बोटें दुखूं लागलीं ! ह्यामुळें केंट–संघाविरुद्धच्या सामन्यांत मी उत्कृष्ट गोलंदाजी केली असं मीही म्हणत नाहीं पण प्रयत्नांची मी शिकस्त केली. सामना संपल्यावर मी ओव्हलवर गेलो. तेथें मी कार्यवाहाच्या खोलींत जात असताना पीटर मेची हालहवाल विचारावी म्हणून मी त्याच्या खोलींत वळलों. केंट–विरुद्धच्या पराभवाची स्पष्ट छाया त्याच्या चेहऱ्यावर दिसत होती. मला पाहिल्यावर त्यानें साधें हास्यही केलें नाहीं. मीही विचार करीत असतांनांच एकदम पीटर मे म्हणाला, I don't think you were trying to bowl them out.' आम्हीं दोघे कमालीचे दमलो होतो व पराभवाबद्दल मे ला जास्तींतजास्त वाईट वाटत होतें. हे सर्व जमेस धरूनही मे ने केलेले हें विधान समर्थनीय होतें असं मला बिलकूल वाटत नाहीं ! एका धंदेवाईक खेळाडूला 'तू प्रयत्न केला नाहींस' असं बिनदिक्कत म्हणणं म्हणजे त्याच्या इभ्रतीला धक्का देण्यासारखं आहे.

लेकर पुढें जोसात लिहितो, 'त्यानंतर आमच्या दोघांमध्यें उच्चस्वरांत वादविवाद झाले. बोलतां बोलतां मी त्याला म्हणालोही कीं तू जगांतला श्रेष्ठ फलंदाज असूनही त्या दिवशीं त्या सामन्यांत एका मंदगतीच्या फुल–टॉसला कसा बाद झालास ? पण म्हणून मी असं म्हणूं कीं 'मे ने प्रयत्न केला नाहीं !' तरीही मी स्पष्टपणें व अदबीनें त्याला सांगितलें कीं 'तूं तुझें विधान मागे घे !' आश्चर्याची गोष्ट म्हणजे हें करण्यास मे ने साफ नकार दिला.'

कांहीं म्हणतील कीं लेकर उगाच काड्याचा नायटा करतोय झालं, असं म्हणून लेकर पुढें लिहितो, 'एवढंच काय मला हेही

अनुक्रमणिका

माहिती आहे कीं पूर्वीचे कप्तान आपल्या खेळाडूंना ह्याहीपेक्षां जास्त कुत्सीतपणें व टीकात्मपणें बोललेले आहेत. परंतु परिस्थिती लक्षांत घेतां मे चें हे विधान आगंतुक ठरलें आहे.' एखाद्या प्रतिवादीप्रमाणें आपलं मतं पटवून देतांना लेकर लिहितो, ' मे आपलें विधान मागें घ्यायला तयार नाहीं हें पाहून मी सरेचा कार्यवाह कमांडर बॅत्रच्या ऑफिसांत गेलो व मी ऑस्ट्रेलियात जाऊं शकत नाहीं असं त्याला सांगितलं. एका वाक्यांत मी त्याला कारण सांगितलं. बॅत्रनें तातडतोब ही माहिती फोनवरून लॉर्डसला कळवून टाकली. परंतु बॅत्रसुद्धा किती बेपर्वाई पहा ! माझं म्हणणं शांतपणें ऐकून घेतल्यावर तो एवढंच म्हणाला, ' तो तुझा प्रश्न आहे ' व त्यानें फान उचलला ! मे व माझ्यामध्यें तडजोड घडवून आणण्याची तयारीही त्यानें दाखविली नाहीं.

लालबुंद झालेला लेकर नंतर लिहितों, 'दुसऱ्या दिवशीं मी माझ्या 'एजंट' चें ऑफिस गांठलें व त्याला सगळी परिस्थिति समजावून सांगितली. योगायोगानें डेनिस कॉम्प्टनही त्यावेळीं तेथें हजर होता. आमच्यांत तडजोड घडून यावी म्हणून कॉम्प्टननें ' लॉर्डस् 'चा दुय्यम कार्यवाह बिली ग्रिफीथ ह्याला फोन केला व मग ग्रिफीथ, रोनी ॲरीड, गुब्री ॲलन, मे व मी अशी आम्हां सर्वांची एक सभा लॉर्डसला झाली. पण ह्या सभेंतही विधान मागें न घेण्याचा आपला नन्नाचा पाढा मे नें पुढें चालू ठेवला ! मग मीही ह्या सभेंत सगळ्यांना ठणकावून सांगितलें कीं मे जर आपल्या विधानाबाबत विचार करण्यासही तयार नसेल तर खेळाडूबाबत अविश्वास दाखविणाऱ्या ह्या असल्या कप्तानाच्या नेतृत्वाखालीं मी ऑस्ट्रेलियाला जायला तयार नाहीं ! '

दिवसामागून दिवस जात होते व परिस्थिति तंग होत होती. पण शेवटीं ह्या परिस्थितींतून मार्ग काढण्याचें श्रेय मे ला मिळालें. कारण कांहीं दिवसांनीं ते दोघे पुन्हां एकदां ' ओव्हल ' वर भेटले त्यावेळीं मे लेकरला म्हणाला, ' झालेल्या प्रकाराचा मी फार गंभीरपणें विचार करीत आहे परंतु माझं म्हणणं सर्वस्वी चूक आहे असं मी कधींच म्हणणार नाहीं. मात्र ' मी असं कधीं म्हणालोंच नाहीं ' असं समजून तूं झालं गेलं विसरून जा ' !

' लेकर म्हणतो, ऑस्ट्रेलियाला जायला मी उत्सुक होतोंच त्यामुळें त्याचं हें म्हणणं माझा राग घालवायला पुरेसं होतं. शेवट गोड झाला म्हणून मलाहि आनंद झाला. '

परंतु इतकं असूनही लेकरच्या मनांत मे बद्दल असूया नाहीं. त्याच्या उत्कृष्ट फलंदाजीबद्दल त्यानें ह्या पुस्तकांत तोंड भरून स्तुति केली आहे व एका ठिकाणीं लेकर चक्क म्हणतो कीं, ' मे हा जगांतला उत्कृष्ट फलंदाज आहे. '

ह्यानंतर ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यासंबंधीं लेकरनें रसभरीत चर्चा केली आहे. खेळाडूंच्या निवडीपासून ते थेट पत्रकारांपर्यंत सगळ्या गोष्टी त्यानें चर्चेत आणल्या आहेत.

कप्तानाच्या वर्तमानपत्रांशीं असणाऱ्या संबंधाबाबत लेकर लिहितो, ' वृत्तपत्राची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेण्याची कप्तानाची आतापर्यंत चालत आलेली प्रथा मे ने मोडली व ' प्रेस 'चा खटाटोप मॅनेजर ब्राऊनकडे सोपवला. माझ्या दृष्टीनें ही सर्वांत मोठी चूक झाली मे चं म्हणणं असं होतं कीं पत्रकाराच्या ससेमिऱ्याला तोंड देणं व चांगलंही खेळणं ह्या दोन्ही गोष्टी एकदम आपल्याला जमत नाहींत. आपल्याला उत्कृष्ट खेळता यावें ह्या सबबीखालीं पत्रकारांची तगादा मे ने हा असा चुकवला. पण असं जर आहे तर हॅमंड, हटन, यार्डले ह्यांनीं कप्तान ह्या नात्यानें चांगले खेळूनही वृत्तपत्राची समस्या यशस्वीपणें कशी हाताळली ? थोडक्यांत म्हणजे ' मे ला जबाबदारी घ्यायला नकोय् हो ' असाच बोलबाला सर्वत्र झाला.

ब्राऊनच्या लायकीबद्दल खळवळून लेकर पुढें लिहितो, ' आणि मे ने वृत्तपत्रासाठीं माणूस कोण निवडला तर फ्रेडी ब्राऊन ! वा रे वा ! जो पुरेसा मुत्सद्दी नाहीं, आधुनिक क्रिकेटबद्दल ज्याला पुरेशी माहिती नाहीं असा ब्राऊन पत्रकारांना काय मुलाखती देणार ? विशेष आश्चर्याची गोष्ट अशी कीं, ज्या ब्राऊनला ही महत्वाची कामगिरी देण्यांत आली होती तो कधींही एका सामन्याला हजर राहत नसे. स्वतःचीं कामें करण्यांत गुंग असे आणि असा हा ब्राऊन वक्तृत्व करणार ? What a good idea it was that Brown should do the talking.'

शांत होऊन तो लिहितो, ' दौऱ्यावर आम्हीं बोटीतून निघालो तेव्हां त्यां बोटींतही दुर्दैवानें माझी पाठ सोडली नाहीं. ह्या बोटींत बसल्याबरोबरच मी जाहीर करून टाकलें–' सप्टेंबर १९५९ नंतर म्हणजे पुढील हंगाम झाल्यावर पहिल्या दर्जाच्या क्रिकेटमधून मी निवृत्त होणार आहे, हो ! ! ' माझी ही घोषणा ऐकतांच सगळेजण डोळे वटारून माझ्याकडे बघूं लागले. पत्रकारांना तर हातात कोलीत मिळाल्यासारखें झालें. कितीक जणांनीं मला येऊन सांगितलं कीं, बाबारे दौऱ्यावर निघण्याआधीं तूं असं कांहीं ' वंगाळ ' बोलला असतास तर तुझी दौऱ्यासाठीं निवड झाली नसती. मला ह्यांत बिलकुल तथ्य वाटत नाहीं. ' स्वतःचा विकास कसा कसा होत गेला ? ह्याबाबतचं विवरण लेकरनें ह्या पुस्तकांत बिलकुल केलेलें नाहीं. फक्त एकच ठिकाणीं तो म्हणतो कीं इजिप्त देशांत त्यानें क्रिकेटचे प्राथमिक धडे घेतले. बस् ! बाकी सगळीं पानें टीकेने भरलीं आहेत. ह्या टीकेमुळेंच त्याच्या ह्या पुस्तकाचा विशेष गाजावाजा झाला. अंपायरिंगबाबत त्यानें केलेली टीका सडतोड आहे व ज्याप्रमाणें गेल्या हंगामांत मेकीफ गाजला तद्वत अंपायर मॅक्इन्स गाजला असं सांगून लेकर म्हणतो कीं काटेकोर पद्धतीनें क्रिकेट खेळणाऱ्या ऑस्ट्रेलियासारख्या देशांतहि ' बॅड अंपायरींग ' चालतें हें लक्षांत ठेवलं पाहिजे, ह्या मॅक्इन्सबाबत आपला अनुभव सांगतांना लेकर लिहितो, ' दौऱ्यावर निघण्यापूर्वी मॅक्इन्सबाबत मी ऐकलं होतं. ऑस्ट्रेलियाचा तो फ्रॅंक चेस्टर आहे असंहि कांहींजण म्हणत. ह्यामुळें मॅक्इन्सच्या ' नजरेखालीं ' खेळण्यासाठीं मी उत्सुक झालो होतों. मी त्याला प्रथम पाहिला तो ॲडिलेड येथें दक्षिण ऑस्ट्रेलिया संघाविरुद्ध खेळतांना. ह्या डावांत त्यानें दोन ऑस्ट्रेलियन खेळाडूंबाबत ' धांवचित 'चा निर्णय दिला. आश्चर्य आहे ! मी चांगलं बघतोय् कीं दोन्हीं खेपेस चेंडू पुरता हातांत येण्यापूर्वींच रॉय स्वेटमननें यष्टी उडविली होती ! ! पहिल्या कसोटी सामन्याच्यावेळीं खुद्द मला त्यानें त्रास दिला तो असा कीं माझ्यासारख्या स्पिन् गोलंदाजाला चेंडू जमिनीवर घासण्यास त्यानें मनाई केली. कारण काय तर म्हणे ' चेंडूचा ' शेप जातो. वास्तविक पाहतां चेंडू जमिनीवर घासणें ह्यांत नियमबाह्य असें कांहीं नाहीं.

### खोटारडा ब्राऊन !!

' ५८–५९ च्या ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यांतील चौथ्या कसोटी सामन्यांत बोट दुखावल्यामुळें लेकर खेळूं शकला नाहीं. परंतु दुर्दैव असें कीं पाचव्या व शेवटच्या कसोटी सामन्याच्या पहि-

अनुक्रमणिका

त्याच दिवशीं सकाळीं लेकरला हुडहुडी भरून ताप भरला. १०३ डिग्रीपर्यंत ताप गेला. डॉक्टर आले व प्रकृती तपासून सामन्यांत न खेळण्याविषयीं लेकरला त्यांनीं सल्ला दिला. यावर लेकर त्यांना म्हणाला, 'कृपा करून,' 'मी खेळूं शकणार नाहीं.' हें मॅनेजर ब्राऊनला जाऊन तुम्हीं सांगा.' डॉक्टरनें त्याप्रमाणें सांगितलें. पण आश्चर्य असें कीं रुग्णपथावर पडलेल्या लेकरची तब्येत बघायला ब्राऊन आला नाहीं. उलट पत्रकारांना खोटेंच सांगितलें कीं 'लेकरला थोडाच ताप आला आहे व डॉक्टरनीं सल्ला दिला आहे कीं त्याला खेळायला कांहीं हरकत नाहीं!' लेकरला नाइलाजानें खेळावें लागलें व दररोज सामना संपल्यावर सहा वाजतां तो तडक गादीवर जाऊन पडे पण चुकून एके दिवशींही मे वा ब्राऊन त्याच्या तब्येतीची साधी चौकशीही करायला आले नाहींत !!

५८–५९ चा दौरा आणखी कुठल्या एका गोष्टीमुळें गाजला असेल तर ह्या दौऱ्यांत 'थ्रोईंग' चा प्रकार उघडकीस आला. मुख्य आरोपी ठरले, मेकीफ, बर्क, स्लेटर व रोर्क! लेकर पुढें लिहितो, 'रोर्क, मेकीफ सारखे नाणावलेले गोलंदाज 'थ्रो' करतात म्हणून लहान–सहान पोरेंही ऑस्ट्रेलियांत त्यांचें अनुकरण करण्यास शिकली आहेत, व हें फार वाईट आहे.' ह्या थ्रोईंगबाबत लिंडवॉलही लेकरला म्हणाला, I am the last of the straight–arm bowlers. that's why they are taking me on the tour of India–just so they have got some one to bowl if all the others are no–balled" ह्यानंतर कप्तानपदाबाबत चर्चा करून मे पेक्षां जार्डीन, शेपर्ड हे सरस कप्तान होते. एवढंच काय पण बेनॉ व मे मध्यें बेनॉ वरचढ कसा ठरला हें लेकरनें मुद्देसूदपणें पटवून दिलं आहे.

एके ठिकाणीं लेकर लिहितो, 'पहिल्या प्रथम मी जेव्हां सरेतर्फें खेळलो तो फलंदाज म्हणून व तेव्हांपासून जर मी फलंदाजीवर जोर दिला असता तर मी एक उत्कृष्ट फलंदाज नक्कीच झालो असतों. पण मग माझ्या गोलंदाजीचं काय? माझी गोलंदाजी नक्कीच निष्प्रभ ठरली असती. पण तसं व्हायचं नव्हतं!' ह्यानंतर 'ऑफ्–स्पिन' गोलंदाजीला यशस्वीपणें कसें तोंड द्यावें ह्याचं छानदार विवरण लेकरनें केलं आहे.

लेकरनें एक नवीन मुद्दा ह्या पुस्तकांत मांडला आहे तो हा कीं, इंग्लंड कसोटी सामने खेळतोच कां मुळीं?' एवढे अटीतटीचे कसोटी सामने होतात त्याला कांहीतरी कारण असलं पाहिजे. लोकांची करमणूक करणें हा एक उद्देश असला तरी मुख्य उद्देश हा आहे कीं इंग्लंडला कुठूनतरी ऑस्ट्रेलियाचा पराजय करायचा असतों. हा एकच ध्यास इंग्लिश–संघाला लागलेला असतो. लेकर लिहितो, 'रक्ताचं पाणी आम्ही जे करतो ते ऑस्ट्रेलियनांना पराभूत झालेले पहाण्यासाठीं. मग दुसरा प्रश्न असा उपस्थित होतो कीं आमच्यापेक्षां कमी बलवान असलेल्या संघाबरोबर आमचे जे सामने होतात त्यांचा उपयोग आम्ही 'रंगीत तालीम' म्हणून करावा कीं काय? पण ह्या कसोटी सामन्यांकडे ह्या दृष्टीनें पाहणें हें केव्हांही गैर आहे असं माझं स्पष्ट मत आहे.'

ह्या पुस्तकांत लेकरनें अनेक खेळाडूंबाबत मतप्रदर्शन केलें आहे. कांहीं वानगीदाखल असे—

गिल्खिरस्टबाबत लेकर लिहितो, 'ह्या माणसाला क्रिकेटमधून जन्माचं काढलं पाहिजे. ह्याच्यासारखा जबरदस्त 'फेक्या' युद्धकाळा-




बागुलबोवा, पाज पाहूं एरंडेल

नंतर मी प्रथमच बघतो आहे. एकदां तर तो चक्क मला म्हणाला, ' लेकर तूं फार चांगला माणूस आहेस. तुला मी कधींच शेकवणार नाहीं पण तो टुमन भारी तोंडाळ आहे बुवा. त्याला शेकवलाच पाहिजे !'

नील हार्वेबद्दल लेकर म्हणतो कीं हार्वेचं एक वैशिष्ट्य म्हणजे मिळालेल्या यशामुळें तो फुगून जात नाहीं कीं अपयश आल्यास कारणें सांगत बसत नाहीं.

काऊड्री व बेलीबाबत लेकरनें असं लिहिलं आहे कीं, काऊड्री स्वतःजवळ असलेल्या गुणांचा पुरेपूर उपयोग करून घेत नाहीं. मे व तो खेळत असेल व मे पेक्षां अधिक धांवा करून पुढें जाण्याची संधी आल्यास काऊड्री त्या संधीचा फायदा घेत नाहीं. ह्या उलट बेलीचं आहे. त्याच्याजवळ असलेल्या गुणांचा तो अतिरेकी उपयोग करतो व कांहीं कांहीं वेळां तोंडघशी पडतो !

## ' लढनेको तुम......... '

ओव्हलवर न्यूझिलंड विरुद्ध कसोटी सामना चालू होता. टुमन व लेकर फलंदाजी करीत होते व रेड व लेग-स्पिनर मॉईर गोलंदाजी टाकीत होते. रेडचे चेंडू खेळायला टुमनला जड जात होतं तर मॉईरचे चेंडू तो चोपून काढत होता. हें पाहून टुमननें लेकरला सांगितलें, ' हें बघ तू ह्या रेडला सांभाळ, मी मॉईरला बघून घेतो ! '

५३-५४ च्या वेस्ट इंडीजच्या दौऱ्याच्यावेळीं चौथ्या कसोटी सामन्यांत टुमन व लेकर खेळत होते, किंग वॅरेल गोलंदाजी करीत होते. किंग ब्राऊन्सर्स टाकून टुमनला बेजार करीत होता तर भरपूर फलंदाजी करून दमलेला वॅरेल कशीतरी गोलंदाजी टाकीत होता. हें पाहून टुमन लेकरला म्हणाला, ' हें बघ, तूं ह्या किंगला सांभाळ मी वॅरेलला बघून घेतो ! '

ह्यानंतर दिलदारपणें स्वतःच्या निवृत्तीविषयीं लेकर लिहितो, ' सतत १३ वर्षे सरेतर्फे खेळून सप्टेंबर १९५९ ला मी ' ओव्हल ' ला रामराम ठोकला. मी केलेल्या बऱ्यावाईट गोष्टींचा पाढा येथें वाचणें हें अप्रस्तुत होईल. परंतु मी जें जें कांहीं केलं त्या त्या सर्व गोष्टींबद्दल मला अभिमान आहे. म्हणूनच माझ्या कामगिरीबद्दल एक लहानसं प्रशस्तीपत्र संघाच्या अध्यक्षाकडून मी अपेक्षिलं तर तें वावगं ठरणार आहे का ? परंतु अशा तऱ्हेचं प्रशस्तीपत्र मला मिळालेलं नाहीं ! एवढंच काय पण शेवटच्या दिवशीं बॅग घेऊन मी तयार झालों तरी कुठल्याही प्रकारचा निरोप मला देण्यांत आला नाहीं. हा अपमान येथेंच संपायचा नव्हता. मी क्लब सोडल्यानंतर एक आठवड्यानें क्लबमध्यें खेळाडू व त्यांच्या कुटुंबाकरितां एका कॉकटेल पार्टीची योजना करण्यांत आली होती. ह्या पार्टीसाठींही मला आमंत्रण धाडण्यांत आलं नाहीं. वास्तविक पहातां वर्षअखेर मी क्लबचा सभासद होतों पण कोणी कदर केली नाहीं. कां नाहीं मी रागावणार ? '

पुस्तकाच्या शेवटीं लेकर लिहितो, ' ह्या पुस्तकांत पुष्कळ ठिकाणीं मी तिखटपणें लिहिलं आहे. परंतु ह्यावरून कोणी असं समजूं नये कीं क्रिकेट खेळावर मी टीका करतो आहे. क्रिकेट खेळ मला मनापासून प्यारा आहे. लहानपणापासून ह्या खेळाबाबत मी जें एक स्वप्न रेखाटलं होतं तें पूर्णपणें साकार झालं ! मला जर पुन्हां बालपण प्राप्त झालें व हा सगळा अनुभव जर माझ्या गांठी असला तर मला पुन्हां जिम लेकरच व्हावंसं वाटेल आणि तो सुद्धां जिम लेकर आफ्स्पिनरच ! '

एवढं लिहून लेकर शेवटीं लिहितो, ' हें पुस्तक संपतां संपतां कितीतरी प्रसंग माझ्या मनःचक्षूंसमोर फेर धरूं लागले आहेत. मी मारलेली तीं दोन ' एकुलती एक ' शतकें...ब्रॅडफोर्ड कसोटी सामन्यांत अवघ्या दोन धांवांत मी घेतलेले ते आठ बळी...१९५६ सालीं मँचेस्टर येथील सामन्यांत मी घेतलेले ते १९ बळी...एक ना दोन. कितीतरी प्रसंग. परंतु मी फेंकलेला एक चेंडू तर मला अजून आठवतो आहे. डावखुरा नील हार्वे खेळत होता. डावी दांडी आणि मधली दांडी यांच्या रेषेंत पडलेला माझा चेंडू किंचित वळला आणि उजव्या दांडीवरची ' बेल ' घेऊन गेला. हा माझा चेंडू मला अजूनही स्पष्ट दिसतो आहे.'

लेकर पुढें लिहितो, ' गेल्या कांहीं वर्षांत अनेकांनीं अनेक चिरस्मरणीय अशीं साहसें केलीं. हिलरी व तेनसिंग एव्हरेस्टचं शिखर चढून गेले, रॉजर बॅनिस्टरनें अवघ्या चार मिनिटांत एका मैलाची दौड मारली. आणली असे कितीतरी लोक. ह्या सर्वांची नांवें इतिहासांत जतन केलीं जातील. या शूर-वीर पुरुषांबाबत मला आदर आहे. त्यांनीं जे विक्रम केले ते करण्यांत मोठंच भूषण होतं. मात्र माझी भावना अशी कीं जें जें मी स्वतः केलें तें आणि तेवढंच केल्याबद्दल मला भूषण व समाधान वाटतं ! ' लेकरसाहेब तुमचं हें म्हणणं आम्हांला पटतं. अच्छा !

• • •



अनुक्रमणिका


संसारदक्ष
मातांची पसंती
डालडा
डालडा
खजुरी छाप
वनस्पति
डालडा
■ डालडा अत्युत्कृष्ट वनस्पति तेलांपासून बनविलेलें असतें.
■ त्यांत वाढत्या मुलांसाठीं आवश्यक तीं जीवनसत्त्वें घातलेलीं असतात.
■ आरोग्यदृष्ट्या हस्तक्षेप-निरोधक अशा सील्बंद डब्यांतून तें मिळतें.
■ ध्यानांत असूं द्या, कीं डालडा सुटें कधींच विकलें जात नाहीं.
स्वयंपाकासाठीं खास शुद्ध स्निग्ध पदार्थ
हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन
DL. 95-140 MA

*बड्या साहित्यिकांना, उमेदवारांना आणि सामान्य व असामान्य अशा वाचकांना अत्यंत आवडलेल्या या विनोदमालेचें हें शेवटचें प्रकरण.*

*श्री. जयवंत दळवी यांनीं ही लेखमाला रमून लिहिली; आणि वाचकांनीहि ती आवडीनें वाचली. मुद्दाम सवड काढून ती आवडल्याचें कळविणाऱ्यांना धन्यवाद !*




त्या प्रसंगाची आठवण झाली म्हणजे हसूं येतें. आणि आपल्याच लोकांच्या स्वभावाची गंमत वाटूं लागते.

भावल्या किलींडर, आतां काय करतो कल्पना नाहीं. त्यावेळीं आमच्या गावांतला एक हौसी नट होता. तो हौसी आहे, नवखा आहे, कच्चा आहे असें त्यावेळीं जिवा शिंगी, सोनू शिंपी, दादू गुरव वगैरे तज्ज्ञ मंडळीचें म्हणणें होतें. पण आपण अगदीं कसलेला नट आहोंत असें खुद्द भावल्याचें म्हणणें होतें. खरें म्हणजे नाटकांत काम करणें हा कांहीं त्याचा धंदा नव्हता. तसें पाहिलें तर आमच्या गांवांतल्या कोणाचा धंदा काय हें कोणाला सांगतां येणार नाहीं. पण एकुलती एक सर्विस मोटर जमेल तेवढी स्वच्छ धुवायची हें त्याचें काम होतें. मोटर–क्लीनरचें काम करायचा म्हणूनच तो भावल्या किलींडर म्हणून ओळखला जायचा. मोटर धुण्याच्या कामाबद्दल त्याला रोजची पावली मिळायची. तेवढीच त्याची कमाई. पण तालुक्यापर्यंत मोटरनें प्रवास घडतो म्हणून तो रोज मोटरींतहि बसायचा. हँडल मारायला आणि पासिंजरांचें सामान चढवायला उपयोगी पडतो म्हणून तेली ड्रायव्हर त्याला मोटारींत घ्यायचा. पासिंजरांची संख्या वाढली म्हणजे तो बाहेर फूटबोर्डावर उभा रहायचा किंवा टपावर आडवा पडायचा. पासिंजर आंत बसला कीं टपावर हात मारून 'हां जाऊं दे !' एवढाच ड्रायव्हरला इशारा द्यायचा. त्याच्या इशाऱ्यासाठीं तेली ड्रायव्हर कधीं थांबत नसे हें खरें. पण आपल्या इशाऱ्यानें सर्विस गाडी सुटते या कल्पनेनें त्याला समाधान वाटायचें. तालुक्याला गेल्यावर चहा–भजीं किंवा क्वचित् भात–आमटीचें जेवण ड्रायव्हरच्या मर्जीनुसार मोफत सुटायचें. मध्येंच कधीं मोटर बंद पडली म्हणजे तेली ड्रायव्हर उतारूंच्या समाधानासाठीं भावल्याला सपाटून शिव्या द्यायचा. भावल्यामुळेंच, त्याच्याच हलगर्जीपणामुळें मोटर बंद पडली असें भासवायचा. आणि आपल्याचमुळें मोटर बंद पडली असा अपराधी चेहरा करून भावल्या खडाखड आवाज करीत हँडल फिरवीत बसायचा. संध्याकाळीं गाडी परत आल्यावर ती धुवायची आणि पावलीचें नाणें कानांत अडकवून विडी फुंकत बाजारांत भटकायचें हा त्याचा जीवनक्रम होता.

अधून मधून दशावतारी नाटकांत येतील तीं कामें करून तो थोडा विरंगुळा मिळवायचा. रात्रीला अधेली घेऊन तो कुठल्याहि दशावतारी नाटकांत स्त्री पार्टीपासून तो थेट शंखासुरापर्यंत सर्व प्रकारच्या भूमिका करायचा. आपलें कांहीं खास वैशिष्ट्य असावें म्हणून तो स्वतःची





अनुक्रमणिका

दाढी-मिशी स्वतःकडे ठेवायचा. मिशीचा चिमटा नाकांत फिट्ट बसला पाहिजे, आरोळी ठोकली तरी मिशी वांकडी होता कामा नये म्हणून स्वतंत्र दाढी-मिशीचा संभार त्यानें सांभाळला होता.

एकदां रमण्यानें त्याची मिशी उसनी घेतली. रमण्याचें मूळ नांव रमण, पण चांगलें नांव तोंडून काढायचें नाहीं हा सर्वांचा खाक्या. त्यामुळें रमण्या या नांवानेंच तो बाजारांत ओळखला जाई. नाटेकराच्या हॉटेलांत तो प्रथम चहा द्यायला आणि कप धुवायला होता. बाजारांतल्या प्रत्येक दुकानांत फेरी मारून चहाची ऑर्डर आणायची आणि भरलेल्या कपाचा मनोरा हातांत धरून प्रत्येक दुकानांत चहाचा कप देत जायचें हें त्याचें काम होतें.

एकदां ताजा बेसनाचा लाडू चोरून खातांना त्याला नाटेकरानें मुद्देमालासह पकडलें आणि कानपटांत मारून बाहेर हुसकलें. तो प्रसंग इतका झटपट घडला कीं आपल्या बचावासाठीं एक शब्दहि उच्चारायला रमण्याला संधि मिळाली नाहीं. कारण अख्खा लाडू त्यानें तोंडांत कोंबला होता. आणि सारें चिकट बेसन तोंडांत बसलें होतें. त्यामुळें त्याला दातांच्या कवळ्यांत अडकलेली जीभ हालवतां सुद्धां आली नाहीं. मग बचावाचा शब्द उच्चारणें दूरच राहिलें. बिचारा कानपटांत थप्पड खाऊन बाहेर पडला.

पण बाहेर पडून रमण्या स्वस्थ बसला नाहीं. नाटेकराचें दुकान आठ दिवसांत बसवून दाखवतो अशी भीष्मप्रतिज्ञा करून तो कामाला लागला. बाजारांतल्या एका रिकाम्या जागेंत चार बांबू रोवून एक बारकेसें खोपट उभें केलें. नाटेकराच्याच दुकानांतून पूर्वी चोरून घरीं नेलेले कान फुटके कप आणले आणि रोखठोक चहाचें हॉटेल सुरूं केलें. चहा आणि भजीं विकून दिवसांकाठीं रुपया-सव्वा रुपया मिळूं लागला.

पण दुर्दैवानें या रमण्यालाहि भावल्यासारखी नाटकांत काम करायची खाज. एकदां कुठें काम मिळालें म्हणून त्यानें भावल्याची मिशी उसनी घेतली. नाटक संपल्यावर काय झालें कोण जाणे. पण झोपायला जायच्या गडबडींत रमण्या मिशी कुठें तरी विसरला. दोन प्लेट भजीं आणि दोन कप चहा मोफत देण्याच्या अटीवर आणलेली मिशी गहाळ झाली. पण भावल्यानें रमण्याची गय केली नाहीं. प्रथम दोन प्लेट भजीं आणि दोन कप चहा फस्त केला आणि मग भांडण सुरू केलें. ताबडतोब मिशी आणून दे, नाहींतर खटला भरतों अशी त्यानें धमकी दिली.

रमण्याही कांहीं कोंकणाबाहेरचा नव्हता. खटल्याचें आव्हान मिळतांच त्याला स्फुरण



**भावल्या किलींडर**
त्याच्या हँडल फिरवण्यांत देखील टोंकदार नाट्याचा अतूट आविष्कार होता.

चढलें. चहाचें लालभडक अर्क स्वतःच्या आणि दुसऱ्याच्या नरड्यांत ओतणारा रमण्या स्वतःच्या मिशीला पीळ देत भांडायला सज्ज झाला. भावल्यानें नुसतें खटल्याचें नांव काढतांच रमण्यानें हायकोर्टाचें नांव काढलें. एकदां काय व्हायचें तें होऊन जाऊं दे! पर्वा नाहीं हायकोर्टाकडे जावें लागलें तरी. चहाचें खोपटं विकीन आणि खटला चालवीन. मिशी तर सोडाच, भावल्याला शेंडीचेंसुद्धां चार केंस देणार नाहीं अशी प्रतिज्ञा रमण्या भर बाजारांत करूं लागला. जिवा शिंप्यानें दादू गुरवाची जशी शेंडी कापली तशी मिशीसाठीं भावल्या आपली शेंडी कापील या भीतीनें रमण्यानें चोवीस तास टोपी चढवली. भावल्यानें नाना यत्न केले पण रमण्याची शेंडी कांहीं हातीं लागत नाहीं हें कळून चुकतांच त्यानें मारामारीवर प्रकरण आणलें. गरम पाण्याचें नडके फुटले. कपबशांचा चुरा झाला. आणि खोपटाचे बांबू मारामारीसाठीं वापरले गेले. अर्थात मारामारी नांवापुरतीच! हातांत बांबू धरून एकमेकांच्या आईबापावरून शिव्यांचीच उधळपट्टी अधिक झाली. बाजारकरांची तास दोन तास करमणूक झाली. या भांडणाचें 'संगीत मिशीचा पीळ' असेंहि नाटकी नांव ठेवून बाजारकर मंडळी मोकळी झाली.

असे विक्षिप्त लोक त्यावेळीं जागोजागीं होते.

रावजी नाना हा नारळाचा व्यापारी. नारळाचा व्यापार चालू असतांना तो धर्मभावनेनें तुडुंब भरलेला असायचा. श्लोक, अभंग, ओव्या त्याच्या ओठांवरून कधीं हालल्या नाहींत. येणाऱ्या-जाणाऱ्याला त्यानें नीतिमत्तेचे चार घोट पाजले नाहींत असें कधीं झालें नाहीं. पण तोच






अनुक्रमणिका

रावजी नाना रोज रात्रीं सामसून झाली म्हणजे काजळलेला कंदील हातांत घेऊन नित्य नेमानें देवळाजवळ रहाणाऱ्या गंगू भावणीकडे जायचा. त्याला तिथें जायचें तर जाऊं दे. पण गांवांतले लोक चावट. त्याला मुद्दाम आडवे येत आणि विचारीत, 'रावजी नाना, रात्रीं खंय ? देवदर्शनाक ?' आणि म्हातारा रावजी नाना त्याहून खट. तो म्हणे, 'होय तर! म्हातारपणांत देवदर्शनाशिवाय दुसरो धंदो कसलो ?' आणि मग झालें गेलें गंगेला मिळालें अशा पद्धतीनें हुश्श करीत गंगूच्या पडवीत पाय टाकी.

गंगू भावीण हें त्यावेळचें एक मोटें प्रस्थ होतें. मी गांवांत होतो तेव्हां ती पन्नाशीकडे आली होती. पण त्याहि वयांत मोठी रगेल आणि रंगेल दिसायची. तिच्या तरूणपणच्या कितीतरी गोष्टी गावांत बोलल्या जात. पालखीच्यावेळीं नथ घालून आणि शालू नेसून ती चवरी ढाळायची. त्यावेळीं एखाद्या संस्थानिकाच्या पट्टराणीसारखी दिसायची. एखादी पोरगी जरा नटली थटली म्हणजे गंगू भावंणीसारखी नटून थटून जाणार कुठें असें तिची आई विचारायची. एखाद्या सुंदर बाईचें वर्णन करायचें झालें तर तें गंगूच्या तुलनेनें व्हायचें.

आमचा सख्या होडावडेकर तिच्याकडे नेमानें जायचा. फार पूर्वी माझ्या आजोबांचें तालुक्याच्या गांवीं तांब्या-पितळेचें दुकान होतें. त्या दुकानांत सख्या नोकर होता. पुढें दुकानाचें दिवाळें वाजल्यावर तो आमच्याकडेच राहूं लागला. त्याचें लग्न झालें नव्हतें. त्याला जवळचें असें कोणी नव्हतें. कांहीं किरकोळ कामें करायचा आणि आमच्या घरींच रहायचा. उन्हांत बसून रहायचें त्याला वेड. उन्हांत खोबरें, मिरच्या, पापड सुकत टाकले म्हणजे हातात काठी घेऊन राखणदारी करीत उन्हांत बसायचा. कावळ्यांना हाकलून लावायचा. मी शाळेंत होतों त्यावेळीं त्याचें वय शंभरीकडे होतें. कमरेंतून काटकोनांत वांकला होता. काठी घेऊन लडबडत लुटुलुटु चालायचा. तासनतास उन्हात बसायचें एक वेड. आणि तास दोन तास गंगू भावणीकडे जाऊन बसायचं दुसरें वेड. त्याला खायला दिलेला लाडू, आंबा तो मुद्दाम राखून ठेवायचा आणि रोजच्या रोज गंगूला नेऊन द्यायचा. तिथें जायचा आणि तास दोन तास पडवींत बसून गंगूला नुसता टकटक पहात रहायचा. ती अधूनमधून या त्या कामानिमित्त आंतबाहेर गेली तर स्वतः-च्याच डोक्यावर हात आपटीत चडफडायचा. न हालतां समोर बसून रहायला सांगायचा. आणि ती समोर बसली कीं आपलीं मळकट बुबुळें स्थिर ठेवून बघ बघ बघत रहायचा. पुढें त्याचे पाय सुजले आणि चालणेंच अशक्य झालें तेव्हां तो गंगूकडे जायचा थांबला. पण तरीहि तो न चुकतां मला नेहमीं विचारायचा, 'आपू' आज देवळाकडे जातलंय ?'

'कित्याक ?'

'गेल्य तर एक लाडू दितंय तो गंगूकडे नेऊन दी !'



**रमण्या.........**
'संगीत मिशीचा पीळ' हें वास्तव-नाट्य रमण्याच्याच खोपटांत रंगलें......

आम्ही सर्वजण त्याची गंगूवरून चेष्टा करीत असूं. पण सख्या होडावडेकर कधीं हंसला नाहीं कीं लाजला नाहीं.

गंगूकडे त्याला भेटणारा त्याचा प्रतिस्पर्धी म्हणजे झिलू केदार. तब्बल पन्नाशीकडला माणूस. अंगाबांध्यानें मजबूत. मटण त्याच्या आवडीचें. ज्या ज्या वेळीं शक्य होत असे त्या त्या वेळीं दुसऱ्याच्या कोंबड्या चोरत असे. थंड पाण्यांत भिजवलेलें फडकें पटकन् कोंबडीवर टाकून तो कोंबडी उचलायचा आणि खांद्या-वरल्या पटकुरींत टाकून धूम ठोकायचा. भिज-लेलें फडकें अंगावर पडलें कीं कोंबडी ओरडत नाहीं. त्यामुळें चोरी झाली तरी कोंबडीचीहि ओरड नाहीं आणि कोंबडीच्या मालकाचीहि ओरड नाहीं. आमच्याकडे मटण असलें म्हणजे तो हमखास आमच्याकडे जेवायला यायचा. मटणाबरोबर आठदहा कांदे करकरां चावून खायचा. पोटाला तडस लागेपर्यंत जेवायचा. तो जेवायला आला कीं सख्या फडफडत रहायचा. त्याला शिव्या द्यायचा आणि झिलू हंसायचा. मटणांतली नळी उचलून म्हणायचा, 'सख्या; फोडतय ही नळी ?' आणि मग सख्या आपली अधांतरी लोंबकळणारी हनुवटी घट्ट आवळून धरायचा.

आणि हाच झिलू केदार एकदा अकस्मात उठला आणि आषाढी एकादशीला पंढरपूरला गेला. रुद्राक्षांची भली मोठी माळ गळ्यांत अडकवून परत आला. त्यानंतर तो अनेकदां आमच्या घरीं आला. पण एकदांही जेवला नाहीं. मटणाच्या घमघमीत वासानें विचलित झाला नाहीं. कारण नर्मदेंत स्नान करून मांस, कांदा, लसूण अशा उत्तेजक पदार्थांवर त्यानें पाणी सोडलें होतें. त्यानंतर उभ्या जन्मांत तो कांद्या-मटणाला शिवला नाहीं. गंगूकडे गेला नाहीं. घरीं बसून तो मुलानें वाचलेली ज्ञानेश्वरी ऐकायचा आणि रात्रीं एकतारी छेडीत भजन करायचा. 'पाहें तिकडे बापमाय। विठ्ठल रखुमाई।' असें म्हणत सर्वत्र वावरायचा.

झिलू केदार मटण खात नाहीं, गंगूकडे जात नाहीं हें सख्याला कळलें तेव्हां तो फक्त तुच्छतेनें हंसला. 'समोर मासळी दिसली नाय तोंवर बगळ्याचां ध्यान !' असें म्हणत सख्यानें झिलूला फक्त हिणवलें.

पुढें सख्यानें डोळे मिटले. तें कळतांच झिलू धांवून आला. गांवांतला एक जुना माणूस गेला म्हणून डोळे टिपत रडला. 'बहु केला फेरा। येथें सांपडला थारा।' असें म्हणत त्यानें सख्याच्या तिरडीला खांदा दिला.

आमच्या घरीं सर्वांना वाटलें होतें, गंगू-भावणीकडे अधूनमधून लाडू, आंबे पाठवूं, असें सांगितलें कीं सख्या पिंड नेईल म्हणून. पण दुपार उलटून गेली तरी कावळा पिंडाला शिवला नाहीं. शेवटीं झिलू पिंडाकडे उभा राहिला आणि हात जोडून म्हणाला, 'मी जन्मांत गंगूकडे जावचंय नाय !'—भुर्रकन् कावळा आला आणि पिंड घेऊन गेला.



अनुक्रमणिका

अशी एक एक जगावेगळीं माणसें !
जगावेगळीं जगलीं. जगावेगळीं मेलीं !
भरडी जमिनींत जन्मलीं आणि मुरमासारखी खडबडीत राहिलीं.

पावसाच्या पुराबरोबर येणाऱ्या पाण्याशिवाय गांवांत दुसरें पाणी नाहीं. तें सुद्धां पावसाळ्याबरोबर बेपत्ता. उन्हाळ्यांत तर प्यावयाच्या पाण्याची सुद्धां मारामार. त्यामुळें धड शेती नाहीं. शेतीची भरपाई करण्यासाठीं कसला जोडधंदा नाहीं. त्यामुळें सर्रास दुष्काळी गरीबी. मूळचीं अभिमानी माणसें गरीबींत खितपत पडलेलीं. त्यामुळें स्वभावांत एक प्रकारचा कडवटपणा खोलवर मुरलेला. मन नित्याचे असमाधानी आणि चडफडणारें ! मूळचें डोकें कुशाग्र. पण तें कुठें गुंतवायला साधन नाहीं. त्यामुळें दुसऱ्याच्या गोष्टींत, विशेषतः भानगडींत, लक्ष घालणें, त्याच गोष्टींचा स्तंभ करणें हें एरव्हीं फुकट जाणारा वेळ घालवायचें एकमेव साधन ! कुणी नवखा माणूस आला, कुणी कांहीं निराळें केलें कीं आवाज मारून चर्चा झालीच. त्यामागोमाग टिंगल आलीच. चर्चेसाठीं कुठें कांहीं मिळालें नाहीं तर कुत्र्यानें पुरलेलें हाड उकरून काढावें तसें कांहीं तरी उकरून काढलें जाई !

बागाईतकर मास्तरनां लग्न होऊन बरींच वर्षे मूलबाळ झालें नाहीं ही बात असो किंवा हरबा जोशी साठींत असतांना त्याच्या तिसरेपणाच्या बायकोला मुलगी झाली ही बात असो. सारख्याच उत्साहानें आणि संशयानें अनेक तर्कवितर्क चालत.

इंच–दोन इंच लांबीची मिशी ती काय आणि त्यासाठीं भावल्या किलींडर रमण्याशीं मारामारी करतो काय असें म्हणून भावल्याची निर्भत्सना करायला जिवा शिंगी जसा तयार असायचा, तसा, रावजी नाना या म्हातारपणांत गंगू भावणीकडे जातो म्हणून त्याला आमचा सख्या खुद्‌खुद् हंसायला मोकळा असायचा.

गांवांतल्या गांवांत दोन बुकें शिकलेला केसूकाका नाडकर्णी जसा गांवांत जन्मला तसाच तो या गांवांत मरायला पाहिजे ? त्यानें चार चौघावेगळें असें कांहींच करतां कामा नये ? आपल्या आवडीनुसार त्यानें थोडें वैद्यकीय संशोधन केलें तर बिघडलें कुठें ? पण त्यांची आणि त्यांच्या संशोधनाची कदर आमच्या गांवांत झाली नाहीं. उलट त्यांची चेष्टाच अधिक झाली. त्यांनीं जेवढें एकूण संशोधन केलें त्याच्या किती तरी पट अधिक त्यांची चेष्टाच झाली. मळका पंचा कमरेला लावून, कधीं नेसता न येण्यासारखा फाटका पंचा खांद्यावर टाकून आणि डोक्याला एक फडकें लपेटून ते उपऱ्यानें बाहेर पडायचे. तर कुणाला पोंचवायला चाललात कां असें मुद्दाम विचारणारीं फुकटी माणसें त्यांना हटकून भेटत असत. तरीहि त्या कुचेष्टेकडे लक्ष न देतां बिचारे केसूकाका डोंगरमाथ्यावर जाऊन फांद्या, पानें, पाळेमुळें यांचा भारा स्वतःच्या डोकीवरून घेऊन घरीं येत. उंदरांमुळें नारळांची नासाडी होते हें पाहून त्यांनीं एक जालीम विषारी औषध तयार केलें होतें. पण त्यावर कुणी विश्वास ठेवला नाहीं. खरें म्हणजे उंदरांवर प्रयोग करून बघायला काय हरकत होती ? पण कोणी तसदी घेतली नाहीं. विशेष जिज्ञासेनें कुणी चौकशी केली नाहीं. सर्वांच्या मतें केसूकाका म्हणजे खुळा इसम ! तो करणार काय ? आणि त्याला विचारणार काय ?

शेवटीं मुद्दाम उंदीर पकडून केसूकाकांनीं अनेकांच्या समक्ष उंदरांना आपलें औषध दिलें. उंदीर तडकाफडकी हातपाय झाडून मेले. गांवांतल्या अनेक लोकांनीं हें पाहिलें. पण केसूकाकांचें औषध परिणामकारक आहे एवढें म्हणण्यासाठीं सुद्धां कोणी तोंड उघडलें नाहीं. नारळाची नासाडी होऊं दिली. पण नासाडी करणाऱ्या उंदरांना मारण्यासाठीं केसूकाकांचें फुकट मिळणारें औषध कुणीं वापरलें नाहीं. उलट, 'औषध जर एवढें जालीम आहे तर केसूकाका स्वतःच का थोडेंसें खात नाहींत ?' असें त्यांच्या पश्चात् विचारायला कांहीं लोकांनीं कमी केलें नाहीं.

गांवांत नांवडणाऱ्या अनेक पाळामुळांचे औषधी गुणधर्म काकांनीं शोधून काढले होते. पोटात नळ उठले तर ते तात्काळ बसवून टाकणारी एक मुळी त्यांच्यापाशीं होती. कुणाच्या पोटांत नळांची पीडा उद्‌भवली आहे एवढें कळलें तरी पुरे ! दक्षिणेची अपेक्षा न करतां स्वतः तंगडतोड करीत काका तिथें जायचे. मुळीचे फेरे उगाळून द्यायचे. त्यामुळें अनेकांची पीडा थांबली होती. पण काका हीच एक पीडा आहे ही कल्पना अनेकांनीं टाकली नव्हती. ज्यांचे नळ काकांनीं बसवले ते सुद्धां दुखणें बरें होतांच 'कसलं मेल्याचा औषध ? मी मेलंय नाय ह्यो नशीब !' एवढें बोलून काकांचे उपकार फेडीत.

तात्या रेडकर हा बोलण्याचालण्यांत जरा चक्रम होता. म्हणून त्याला 'हापमॅड' म्हणण्यांत सर्वांना धन्यता वाटायची. तात्या रेडकर या नांवापेक्षां हापमॅड तात्या या एकाच नावानें तो ओळखला जाई. या हापमॅड तात्याचा मुलगा दिनक्या. दिनकर हें त्याचें सरळ स्वच्छ नांव. पण त्याला दिनकर कुणींच कधीं म्हटलें नाहीं. दिनक्या या नांवानेंच तो सर्वश्रुत होता. मुंबईतल्या अठ्ठावीस सालच्या संपांत

दिनक्यानें भाग घेतला होता. त्यामुळें तो बेकारहि झाला होता. पण संपामुळें इतका प्रभावीत झाला होता कीं, दोनचार दिवसांतच कामगारांची सत्ता येणार आणि स्वतःला कुठलें तरी प्रमुख पद मिळणार अशा स्वप्नांत होता. बेकार झाल्यामुळें तो गांवांत आला होता. गांवी येतांच त्यानें नायकाच्या दुकानांत आसन ठोकून मार्क्सवादावर छोटेसें वक्तव्य केलें. नायकाच्या दुकानावर रिकामटेकड्या बामणांचा अड्डा असायचा. मार्क्सवादानुसार सर्वत्र वर्गविग्रह होऊन कामगार आपली सत्ता स्थापन करणार असें दिनक्यानें भविष्य वर्तवतांच अन्तू मठकर पंचाची कनवट आवळत उभा राहिला. सारे श्रोते एकमेकांकडे पहात कुत्सिपणें हंसले. तेव्हां अन्तू दिनक्याकडे बघत कुरखुरलं, 'आमकां वाटललां तुझ्या घराण्यांत फक्त एकच हापमॅड आसां म्हणून!' एवढेंच बोलून अन्तू बाहेर पडला.बाकीचें मुंड्या हालवीत खोखो हंसले आणि जागच्याजागीं दिनक्याच्या प्रतिपादनाचा विचका उडाला. मार्क्सवादाची इतकी रोखठोक वासलात अन्यत्र कुठें लागली नसेल.

मार्क्सवादी, समाजवादी, कॉंग्रेसवादी अनेक प्रकारचे वादी या गांवांत वेळोवेळीं आले आणि गेले. पण कुठलेंहि वादी येथें रुजलें नाहींत. फक्त वादी आणि प्रतिवादी हे दोनच वादी तेवढें मूळ धरून राहिले. दिनक्यानें सांगितलेले भांडवलदारांच्या नफ्याचे आंकडे लोकांना महत्वाचे वाटले नाहींत. कोर्टांत पडणाऱ्या तारखांचे आंकडे आणि फार तर मुंबईहून येणाऱ्या मनीऑर्डरीवरले आंकडे या दोन आंकड्यांशिवाय इतर आंकड्यांची भुरळ आमच्या गांवकऱ्यांना कधीं पडली नाहीं.

वागण्यांत थोडेसे असे तिरसट असले तरी या लोकांसारखे सनदशीर लोक दुसरीकडे कुठें सांपडायचें नाहींत. किरकोळ भांडणें हीं नेहमींचीच असत. तीं नसतात कुठें? पण शिव्याशापानें न थांबलेलीं भांडणें कोर्टांत जातील. त्यासाठीं हाणामारी होणार नाहीं. देशावरचा शेतकरी कुऱ्हाड घेऊन खून पाडील. एका घावांत शीर धडावेगळें करील पण आमचा गांवकरी तसें कधीं करणार नाहीं. सर्वांगानें उघडा राहून फक्त वितीची कांश्री कमरेला लावणारा आमचा शेतकरी कुणाच्या समोर कमरेच्या आंकड्याला अडकवलेल्या कोयत्याला हात घालणार नाहीं. क्वचित त्यानें हात घातला तरी कुणी घाबरणार नाहीं. कोयता हातांत धरला तरी तो उगारणार नाहीं. उगारला तरी मारणार नाहीं आणि तोल सुटून त्यानें मारला तरी तो लागणार नाहीं ही गोष्ट वेगळी! संताप व्यक्त करण्याचा एकमेव मार्ग म्हणजे आईबहिणीचा उद्धार करणाऱ्या शिव्या द्यायच्या. देण्यासारखें असें त्यांच्यापाशीं एवढेंच! गांधी वधानंतर सर्वत्र जाळपोळ झाली. ब्राह्मणेतरांनीं ब्राह्मणांचीं घरें लुटली पण आमच्या गांवांत तसें कांहीं घडलें नाहीं. गांधीला मारलें तें वाईट झालें, वैर होतें तर मेरपर्यंत शिव्या नसत्या कां देतां आल्या? ठार कशाला मारलें? एवढीच प्रतिक्रिया आमच्या गांवांत झाली. पण जाळपोळ किंवा लुटालूट झाली नाहीं. नाहीं तरी लुटायचें तरी काय? लंगोटीवाल्यानें पंचाला हात घालायचा!

गांवांतलें नायकाचें भुसारी दुकान हा गांवचा सार्वजनिक अड्डा. सगळे रिकामटेकडे गांवकरी आणि विशेषतः नेहमींच रिकामे असलेले बामण या दुकानावर येऊन बसायचे. सारी फुकटफौजदारकी येथून चालायची. नायकाचा पोरगा इंग्रजी दुसरींत जातांच त्यानें मोरोबा टांककराचें पिकॉकबा पेनकर असें नामाभिधान करून आपलें इंग्रजीचें ज्ञान याच अड्ड्यावरून खर्ची घातलें होतें.



**'कोंबडी चोर' झिलू केदार**

कोंबडी पकडणें आणि दांतांनी नळी फोडणें यांत झिलू-इतका वाकबगार त्या नंतरच्या पिढींत कुणीच झाला नाहीं!

चरखा फिरवून स्वराज्य मिळवणार असें गांधींनीं म्हणताच 'चरखो फिरवून स्वराज्य गांवलं असतां तर नांगर फिरवून शेतांत पीक आयलं नसतां?' एवढीच कुत्सित टीका या अड्ड्यावर झाली होती. बेचाळीस सालीं रातोरात कॉंग्रेस पुढाऱ्यांना पकडल्याचें वाचतांच 'पिंजऱ्यांत रात्रीचे उंदीर जातंत तसं गेले मरे!' एवढी अल्पशी हळहळ याच नायकाच्या दुकानांत व्यक्त झाली होती.

बर्नार्ड शॉनें दाढीवर रस सांडीत रत्नागिरीचे हापूसचे आंबे खाल्ले हें वाचतांच कुणाला कांहीं वाटलें नाहीं. उलट 'म्हातारो आंब्याचो बाटो गळयांत अडकून मेलो नाय ह्यां खूप झालां!' असे उद्‌गार नायकाच्या दुकानावर निघाले होते. नेहरूंनीं भेट म्हणून पाठवलेले आंबे इंग्लंडच्या राणीला आवडले हें वाचतांच 'फुकट गावले तर वाईट कित्यांक?' एवढें अर्थशास्त्रीय सत्य याच अड्ड्यावरून ध्वनित केलें गेलें होतें.

मुंबईला चार पैसे कमावून सुट्टीसाठीं गांवीं आलेलीं माणसें श्रीमंती दाखवायचा यत्न करायची. कोटाच्या खिशांत पैशाची खुळखुळ करीत नायकाच्या दुकानांत यायची.

'नायका, मुंबईसारखा चहा आहे?'

'आसा तर!' असें म्हणत नायक आंत जायचा. त्यांच्याकडे लांकडी खोक्यांत एकाच प्रकारचा चहा असायचा. वरची चिमूटभर पांवडर कागदावर घेऊन तो बाहेर यायचा आणि सॅंपल दाखवायचा.

'छे! ह्याला वासच नाहीं. हा कसा रत्तल?'

'बारा आणे!'

'ह्याच्या वरचा चहा आहे?'

'होय तर —'

नायक पुनः आंत जायचा. दुसरें सॅंपल घेऊन यायचा.

'ह्याचा काय दर?'

'रुपयो रत्तल!'

'त्यापेक्षां अधिक वासाचा नाहीं?'

'आसा–आसा!

नायक पुनः आंत जायचा. तिसरें सॅंपल आणायचा.

'हा कसा?'

' सव्वा रुपयो ! '

' मग हा द्या रत्तलभर ! '

रत्तलाची पुडी घेऊन आणि सव्वा रुपया देऊन मुंबईचा पाव्हणा परत जायचा.

' नायका, तीन जातीचो चहा कधींपासून ठेवतंय ? ' तिथेंच बसलेल्या टोळक्यांतून कुणी तरी प्रश्न विचारायचा.

' म्हणजे काय ? धंदो करूंक होयो तर सगळो मला ठेवूक होयो. ' नायक गालांतल्या गालांत हंसायचा आणि पेटींत पैसे टाकायचा.

खरें म्हणजे नायकाकडे चहाचा एकच खोका असायचा बारा आणेवाला. पण कोणी भारी-पैकीं चहा मागितला तर त्याच खोक्यांत तळाला हात घालून तो अधिक वासाचा चहा उपसून वर काढायचा आणि तो अधिक किंमतीला विकून धंदा करायचा. आणि पुनः वर मुंबईकरांची मिजास अशीच उतरवली पाहिजे असें म्हणून घमेंड मारायचा.

शकुनी नावर हा याच अड्ड्यांतला एक सभासद. नायकाला न विचारतां बरणींत विक्रीस ठेवलेल्या खोबरेल तेलाची धार हातांत घ्यायचा आणि तेल माथ्याला चोळत चोळत घरीं जायचा. पण नायकानें त्या गोष्टीला कधींच विरोध केला नाहीं. नावराच्या घरीं पाठवायची साखर मापतांना त्यांतून तेलाच्या धारेचें वजन आपोआपच कमी व्हायचें. तेलाची धार डोक्यावर घेतली नाहीं तरी साखरेचें माप ढळणारच याची नावरला खात्री आणि साखरेचें माप हें ढळलें नाहीं तरी तेलाची धार ही वहाणारच याची नायकाला खात्री !

अशा विलक्षण लोकांचें हें गांव !

सारें कांहीं तिरकस नजरेनें पहायचें हें आमच्या अंगवळणी पडलेलें. लहानपणापासून तेंच एक बाळकडू !

शाळेंत असतांना आम्ही जो इतिहास वाचला त्यांत कोकणामध्यें कोणी कधीं मर्दुमकी गाजवल्याचें फारसें वाचनात आलें नाहीं. आमच्या गांवच्या हद्दीवर समुद्राच्या किनाऱ्या-वर मोडकळीस आलेला एक किल्ला आहे. तो आतां आहे कीं नाहीं कोण जाणें. त्यावेळीं मात्र होता. आमच्या शाळेची सहल तेथें जात असे. हा गड कुणी आणि कां बांधला, त्यावर कुणी पराक्रम केला हें आम्हांला आमच्या शिक्षकांनीं कधींच सांगितलें नाहीं. फक्त एका बुजलेल्या भुयाराकडे बोट दाखवून आमचे अमृते मास्तर सांगायचे, ' या इथून, या भुयारांतून मराटे पळ काढीत असत ! आमच्या गांवापासून बऱ्याच दूरवर दुसरा एक किल्ला आहे. सिंधु-दुर्ग त्याचें नांव. मी तो आंतून पाहिलेला नाहीं. अनेकांनीं पाहिलेला नसेल. बोटीनें मुंबईस जातांना त्या किल्ल्याचें दर्शन होतें. त्या किल्ल्याची मला फारशी माहिती नाहीं. अनेकांना नसेल. परन्तु त्या किल्ल्यांत एका भिंतीवर शिवाजीच्या हाताचा आणि पायाचा असे दोन ठसे आहेत, आणि शिवाजी पळ काढीत असतांना ते ठसे उमटले होते एवढीच ऐतिहासिक माहिती माझ्यापाशीं होती आणि आहे.

जी इतिहासाची गत तीच पुराणाची.

देवळांत होणाऱ्या प्रत्येक उत्सवांत कीर्तनाचें सत्र असायचें. हातांत चिपळ्या घेऊन आपटे-शास्त्री कीर्तन करायला उभे रहात. अख्खा दिवस चूर्ण कुटण्यांत आणि पंचा नेसून घरचीं लांकडें फोडण्यांत वेळ जाई. त्यामुळें बिचाऱ्यांना शास्त्राकडे लक्ष द्यायला फारशीं फुरसत कधीं मिळाली नाहीं. पण वाडवडिलांची गादी चालवण्यासाठीं बिचारे कीर्तनाचा प्रपंच करीत. त्या निमित्तानें त्यांना देवळांतून नारळा-तांदळाची बिदागी मिळे ! शिडशिडीत प्रकृतीच्या वाडवडिलांनीं मागें ठेवलेली बारावंदी नाइलाजानें अंगावर चढवीत. पण आपटेंची तब्येत पोसलेल्या भोपळ्यासारखी. त्यामुळें आटलेला अभ्रा लोडावर ओढावा तशी ती बारावंदी त्यांच्या अंगावर दिसे. कीर्तन सांगतांना जरा वांकले तरी पाटीवरून टर्र आवाज येतो कीं काय अशी भीति वाटायची. रुक्मिणी श्रीकृष्णावर एकदां रागावली आणि मग जेव्हेत्ते कालाच्या ठायीं कृष्णानें तिला भरजरी शालू देण्याचें वचन देऊन तिचा राग घालवला असें मुरका मारून सांगतांना कृष्णानें चांगला अठ्ठावीस रुपयांचा भरजरी शालू दिला असें आपटेशास्त्री बोलवून सांगत–अठ्ठाविसांतल्या जोडाक्षरीं 'ठ्ठा' वर मठा प्याल्यावर मिटकी मारावी तसा भर देत असत. त्यामुळें शालूची किंमत वाढते असें त्यांना वाटायचें कीं काय कोण जाणे !

अगस्तिमुनीनें सागराचें प्राशन केलें ही भव्यदिव्य गोष्ट सांगितल्यावर पुनः सागर कसा दिसतो या शंकेचें निरसन करतांना ' अगस्ति चळचळां मुतला आणि पुनः सागर निर्माण झाला ' अशी खाऱ्या पाण्याची संगती फक्त आपटेशास्त्रींनींच लावावी !

याला अंत नाहीं !

हीं माणसें–हे प्रसंग यांना अंत नाहीं.

भोंवतालच्या परिस्थितीनें जशी घडवलीं तशीं झालीं. परिस्थितीमुळें जसें वागावें लागलें तशीं वागविलीं. आंत एक, बाहेर एक असा प्रकार नाहीं. दाखवायचे दांत एक आणि खायचे दुसरे अशी रीत नव्हती. उलट दाखवायला दांत आहेत, पण खायला कांहीं नाहीं असा प्रकार होता. बिचारीं दुःखांत मुरलेलीं होतीं. पण दुःख म्हणजे काय याची निराळी कल्पना नव्हती. दुःखाचा अलग विचार त्यांच्या मनांत कधीं आला नाहीं. जसें जमलें तशीं जगलीं. वागण्यांत सांगड नव्हती. स्वभावावर बेगड नव्हती.

आपटेशास्त्री म्हणत त्याप्रमाणें ' घरांत कोरड आणि वरांत ओरड ' हेंच एक नित्याचें जीवन होतें. तेवढें तीं जगलीं.

अशीं हीं जिवंत माणसें या गांवांत जन्मलीं, वाढलीं आणि आतां बरीचशीं गेलीं सुद्धां. आपल्या पश्चात् आपली कोण आठवण काढील, कुणाच्या मनांत आपल्याला स्थान असेल याची त्यांना कल्पना सुद्धां नव्हती. कुणी आपली आठवण काढावी, कुणाच्या मनांत आपल्याला स्थान असावें अशी अपेक्षाहि त्यांनीं कधीं धरली नव्हती.

पण माझ्या मनांत मात्र हीं माणसें पक्की आहेत. जिवंत आहेत. होतीं तशींच आहेत.

या जन्मांत त्यांची उचलबांगडी होणार नाहीं. ● ● ●




*एखादी अज्ञ माता अतिलाडानें ज्याप्रमाणें आपल्या पुत्राचें नुकसान करते, त्याचप्रमाणें श्रीकृष्णाच्या भक्तांनीं श्रीकृष्णाचें लोकविलक्षण बुद्धिवैभव प्रकट करणारा प्रसंगच--विराट स्वरूपांत वर्णून देवाचें नुकसान केलें. सत्यस्थितीकडे त्यांचें संपूर्ण दुर्लक्ष झालें.*

# इथें कुणाला समेट हवा आहे !

**न हि युद्धं न कामये !। २८ ।।**

**इथें कुणाला समेट हवा आहे !**

राजकारणी लोक एखाद्या प्रश्नाचा घोळ असा घालतात की त्याचा अंत म्हणून कधीं लागूंच नये. पुन्हां वाटाघाटी, पुन्हां मध्यस्थ, पुन्हां निषेध, पुन्हां दूत, पुन्हां चर्चा, हें राजकारणाचें स्वरूप, याच स्वरूपांत महाभारत कालींही चालू होतेंच. सुदैवानें भारतीय महापुरुष कृष्ण हा त्याला अपवाद होता. कुशल शस्त्रवैद्य ज्याप्रमाणें सडलेला अवयव कापून टाकीत असतो त्याप्रमाणें कोणताही प्रश्न कुजविण्याऐवजीं तो तडीस लावणें अशी कृष्णाच्या राजकारणाची दिशा होती.

भारतीय युध्दाच्या आरंभकालींही दूत जात होते. येत होते. पण कांहीं तड लागत नव्हती. निर्णय घेण्यास युधिष्टिर हा माणूस सर्वस्वी असमर्थ आणि अपात्र होता हें आपण पाहिलें आहे. त्यामुळें पांच गांवांची दरिद्री भीक दुर्योधनानें नाकारली. उगाच दुसऱ्याच्या घरांत जाऊन अडमडण्यास युधिष्ठिरास फार आनंद होत असे. त्याला मुळांतच कापून काढणें इष्ट आहे हें दुर्योधनानें जाणलें होतें. त्याच्या दृष्टीनें इथें दानाचा, धर्माचा, प्रश्नच नव्हता. सुईच्या अग्रावर मावेल इतक्याही जमिनीवर, या कुलांतील छोट्या पातीच्या अवैध संततीचा अधिकार नाहीं अशी त्याची स्वच्छ धारणा होती. पंडू मरण पावल्यावर अनाथ म्हणून तुकडे मोडण्यासाठीं आलेला युधिष्ठिर हळुहळू युवराज आणि राजा होऊन पूर्वी एकदां काळजांतील कांटा झालेला होता. शकुनीच्या सहाय्यानें हा कांटा हिसकला जाऊन आतां काळजाची जखम बुझली होती. सत्ता स्थिर झाली होती. दूध नासावयास नको असेल तर त्यांत मिठाचा कण पडण्याआधींच काळजी घ्यावयास हवी; घर कोसळावयास नको असेल तर मुईच्या अग्रावर राहील इतकी मृत्तिका पोखरून होण्याच्या अगोदरच घुशीला चोंपावयास हवें; ही त्याची ठाम भूमिका असल्यानें त्यानें युधिष्ठिरास पार धुडकावून लाविलें. कुरुकुलांतील सारा ठामपणा जसा दुर्योधनाच्या वांट्यास आला होता तसा सारा डळमळीतपणा युधिष्ठिराच्या वांट्यास आलेला असल्यामुळें तो संशयात्मा नेहमीं तिठ्यावर बसलेला असे. त्याला नेहमीं धर्माचे शंभर फांटे दिसत आणि कुठचा मार्ग धरावा हें सुचत नसे.

**आत्माराम नीलकंठ**

त्यामुळें अनेक वाटाघाटी विफल झाल्यावर त्यानें शेवटीं कृष्णास वाटाघाटीसाठीं दौत्यास जावयाची विनंती केली. पूर्वी द्रौपदी आणि कुंती यांच्या मनोभूमिकेचा विचार करतांना आपण कृष्णाच्या दौत्याचा प्रश्न तेवढ्यापुरता स्पर्शून सोडून दिला होता. आतां आपणास याच प्रश्नाचा विचार करावयाचा आहे कीं कृष्ण जो दौत्यास निघाला होता तो खरोखरच समेट करावयास निघाला होता काय ? समजा, दुर्योधन सज्जनपणें वागता तर कृष्णानें समेट करून युद्ध टाळलें असतें काय ?

या प्रश्नाचें निश्चित उत्तर नाहीं असें आहे. त्याला दोन अनुभानें अशी : अर्धे राज्य मिळून समेट झाला असता तर धर्माच्या पोटापाण्याची सोय झाली असती हें खरें, पण त्याहून मोठा असा द्रौपदीच्या अक्षम्य अपमानाचा प्रश्न अनिर्णित राहिला असता. द्रौपदीच्या निरीस हात घालणारा दुःशासनाचा हात मातींत पडून सडल्याशिवाय आणि

द्रौपदीस उघडून दाखविली गेलेली दुर्योधनाची उद्दाम मांडी चूर झाल्याशिवाय हिशोब जमणारच नव्हता; याची पुरेपूर जाणीव कृष्णाला होती.

दुसरी गोष्ट समेट होऊन युधिष्ठिरास अर्धे राज्य मिळतें तरी दुर्योधन जिवंत असेपर्यंत तें पचविण्याची ताकद पामर युधिष्ठिरास कुठें होती? युधिष्ठिरास पूर्वी यौवराज्य मिळालें तें हिसकून घेण्याचा दुर्योधनाचा बेत आधीं कळूनही, तें राखण्याचा मार्ग युधिष्ठिरास मिळाला नाहीं. त्यानें मार्ग सुधारला तो पांच निरपराध माणसें जाळून प्राणभयानें वनांत लपण्याचा. पुढें कृष्णार्जुनांनीं त्याला राज्य संपादून दिलें तें तो राखूं शकला नाहीं. द्यूतप्रसंगीं त्याला यादवानें तिसऱ्यावेळीं राज्य मिळवून दिलें तेंही तो टिकवूं शकला नाहीं. एकदां हात जळल्यावर अग्नीला भ्यावें ही तान्ह्या मुलासही असणारी उपजत अक्कल या महाधर्ममार्तंडास नव्हती. समेटानें राज्य मिळवून दिलें असतां तें टिकविण्याची अक्कल युधिष्ठिरास आहे असें मानावयास कृष्णास आधार नव्हता. समेट याचा अर्थ नवी संकटें, नवे अपमान यांस आवाहन हें कळण्याची कुवत कृष्णाला होती.

त्यामुळें कृष्ण समेट करावयास जाणें शक्यच नव्हतें. तो युद्ध अटळ करण्यासाठीं, त्याचा समय निश्चित करण्यासाठींच गेला होता. दुसरा कोणीही दूत गेला तरी त्याच्या हातून हें होणार नाहीं याची त्यास जाणीव असल्यानें त्यानें ही महान जबाबदारी आपणावर स्वीकारली. युधिष्ठिरास हा दृष्टिकोन समजण्याची कुवत नाहीं हें जाणणारा कृष्ण त्याला मोघम म्हणाला,

'समेट होवो किंवा न होवो. पण प्रयत्न केला नाहीं अशी निंदा लोकांनी करूं नये म्हणून मी जातों.'

युधिष्ठिरास दुखवूं नये म्हणून कृष्णानें त्याला हें उभयान्वयी उत्तर दिलें खरें. पण साऱ्या गुळमुळीतपणाचा होम करण्यास समर्थ अशी जळती आग तिथेंच बसली होती. ती म्हणजे द्रौपदी. तिनें हा गुळमुळीतपणा त्याच सभेंत, त्याच बैठकींत झाडून काढला. युधिष्ठिरास काय वाटेल याची पर्वा न करता तिनें कृष्णाच्या जळजळीत झाडा घेतला. या मळमळित सौभाग्याच्या सुखदुःखाची फिकीर करावयाची तरी किती! प्रत्येक गोष्टीला मर्यादा हवीच.



—मूर्खा, मोहवश होऊन तूं मला एकटा समजत आहेस. मला पकडूं पहात आहेस. पण यावेळीं माझ्या सेनेकडून तूं चौफेर घेरला गेला आहेस याची तुला जाणीव नाहीं. (एते वा मामहं त्वेनान्) हे मला पकडतात कीं मी यांना पकडतों तें तुला कळेल.

द्रौपदीस दुःख होण्याचा प्रसंग आल्यावर युधिष्ठिराच्या दुःखाचा विचार करणें ही गोष्ट कृष्णाच्या हातून होणार नव्हती. त्यामुळें दुःशासनाच्या रक्तानें भिजलेल्या हातांनीं तुझ्या मुक्त केसांची वेणी घातली जाईल असें निःसंदिग्ध उत्तर त्यानें भरल्या सभेंत युधिष्ठिरासमोर तिला दिलें. यावरून त्याचा उद्देश स्पष्ट होतो.

पुढें हस्तिनापुरास गेल्यावर कृष्ण दुर्योधनास पदोपदीं ठोकरा देतो त्यावरून ही गोष्ट स्पष्टच होते. दुर्योधनाच्या स्वभावाचें स्पष्ट ज्ञान कृष्णाला असतें. त्याचा गौरव केला, पांडवांसाठीं भीक मागितली तर तो कदाचित् वळण्याचा संभव हें कृष्ण जाणत असतो. तो असा वळूं नये आणि चुकूनही त्यानें आपलें म्हणणें मान्य करूंच नये असेंच धोरण कृष्णानें ठेवलेलें असतें.

कृष्ण येतो त्याची उतरण्याची सोय दुःशासनाच्या महालांत करण्यांत येते. शक्यतर कृष्ण वळून आपल्या पक्षास यावा म्हणून त्याच्यासाठीं स्वर्गीय थाट उभारण्यांत आलेला असतो. नाना सौंदर्यलक्षणें मिरविणाऱ्या स्त्रिया, सुवर्ण, रत्नें इत्यादींचीं दानें त्याला लांच म्हणून तेथें सज्ज असतात. पण कृष्ण या सर्वांस उघडपणें लाथाडून विदुराच्या घरीं मुक्कामास जातो. लक्षांत घ्या. अजून बोलणीं सुरू व्हावयाचीं आहेत. अशावेळीं का ही ठोकर समेटास अनुकूल वातावरण बनवील? दुर्योधन त्याला स्पष्टपणें म्हणतो, 'तूं मध्यस्थ. दोघांना समान म्हणून आलेला माणूस. तुला हें वर्तन शोभत नाहीं.'

यावर कृष्ण मोठें मासलेवाईक मसालेदार उत्तर देतो

—'दुर्योधना अशा गोष्टींचा स्वीकार दोनच प्रसंगीं संभवतो. एक देणाराच्या मनांत प्रेम असेल तर आणि दुसरा घेणारा गरजू असेल तर. तुझ्या मनांत प्रेम नाहीं आणि मी गरजू नाहीं.'

अशी पार्श्वभूमी कृष्णानें तयार केली ती काय समेट करण्यासाठीं? जे असे म्हणतात, 'त्यांनीं आपणास शांतिदूत खुशाल म्हणवावें पण भागवत म्हणवूं नये हें बरें.'

कृष्णानें समेटाचें बोलणेंही दुर्योधनावर मेहेरबानी करण्याच्या सुरांत केलें आहे. 'युद्धाचें हें महाभयंकर संकट तुमच्यावरच आललें आहे. तुझी इच्छा असेल तर या भयानक विपत्तीचें निवारण होऊं शकेल. तुझी वृत्ती दुराग्रहाची आहे. विपरीत आहे. या कर्मानें तुझा समूळ नाश होणार आहे. अरे, अर्जुनाशीं लढण्याची तुला ताकद तरी आहे काय?' अशा सुरांत चाललेल्या बोलण्यास दुर्योधन वाकेल असें मानण्याएवढा कृष्ण दूधखुळा नव्हता. तर ज्यामुळें समेट दुरापास्त व्हावा पण त्याचें खापर दुर्योधनावर फुटावें असें कौशल्याचें धोरण कृष्णानें ठेवलें होतें.

हें युद्ध यापुढें टळू नये असाच प्रयत्न त्याला करावयाचा होता. त्यामुळें दौत्यास निघण्या आधीं जेव्हां त्याचें भीमाशीं बोलणें झालें तेव्हां त्यानें स्पष्टच सांगितलें कीं 'न हि युद्धं न कामये.' मला युद्ध नको असें तुला वाटत असेल तर तसें नाहीं. इथें कोणाला समेट हवा आहे? मला युद्धच पाहिजे.

## ंस्थापयिष्यामि पांडवान् ।। २९ ।।
## मी पांडवांचा नियंता आहे

भारतीय युद्धाच्या आरंभीं कृष्ण दूत म्हणून हस्तिनापुरास गेला तेव्हांचा त्याचा अधिकार काय होता याचा इथें विचार करणें आहे. दूत म्हणून जाणारे लोक विशिष्ट निरोप आणि विशिष्ट अधिकार घेऊन जातात. त्या निरोपाबाहेर आणि अधिकारमर्यादेबाहेर त्यांना बोलाचालायचें नसतें व स्वतःच्या अधिकारांत कोणतीही गोष्ट करतां येत नाहीं.

पण कृष्ण जेव्हां दौत्य करावयास जातो तेव्हां तो युधिष्ठिराच्या आज्ञेनें त्याचा दूत म्हणून गेला असतांही युधिष्ठिराच्या निरोपाचें सूत्र आणि छटा यांना साफ फांटा देतो. ही अनुचित गोष्ट तो करतो ती त्याला दौत्याचे नियम माहीत नसतात म्हणून नव्हे. याचें खरें कारण असें कीं तो जरी कायदेशीरपणें दूत अशी पदवी धारण करून गेलेला असला तरी वस्तुतः तो दूत नसून सर्वाधिकारी झालेला होता. सूत्रधार झालेला होता.

त्यानें जाणलें होतें कीं आपण हीं सूत्रें हातांत घेतल्याशिवाय यापुढें निभाव लागणार नाहीं. युक्तीच्या चार गोष्टी सांगाव्या असा आपला उद्देश आहे हें खरें. पण अशा युक्तीचा उपदेश नुसता करून काय उपयोग ? तो उपदेश अमलांत आणण्याचें सामर्थ्य आणि धमक उपदेश ऐकणाराच्या अंगांत हवी. अन्यथा त्या उपदेशाची गत 'नळी फुंकिली सोनारें ' अशा तोलाची व्हावयाची. अशा तऱ्हेची धमक आणीं कुवत युधिष्ठिरामध्यें नाहीं हें कृष्णानें ओळखलें होतें. 'उपदेशोहि मूर्खाणाम् प्रकोपाय' यां नात्यानें नादान माणसास उपदेश केला असता तो त्याच्यावर संकटें आणण्यास कारण होतो हें कृष्ण जाणत होता. युधिष्ठिरामधें कोणताही खंबीर निर्णय घेण्याचें सामर्थ्य तर नव्हतेंच; परंतु दुसऱ्यानें निर्णय घेतला असता तो नेटानें अमलांत आणावयाची धमकही नव्हती. अति शहाणपणा हा नेहमी बाधक असतो. अशा माणसाचा बैल नेहमीं रिकामाच रहातो. त्याच्या बुद्धीचा निर्णय होता होत नाहीं. युधिष्ठिराची अवस्था अशीच होती. तो धर्माच्या बाबतींत अति शहाणा होता.तो एकदा चक्रव्यूहांत गुंतला म्हणजे त्याला त्यांतून मार्ग मिळणें दुरापास्त होत असे. त्याच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे 'महाजनो येन गतः स पन्थः ' म्हणजे कोण कांहीं उपदेश करील तो त्याला तेव्हां खरा वाटे. त्याला स्वतःची बुद्धि नव्हती; किंवा असल्यास तिचा निर्धार प्रकट करण्याचा धीर नव्हता. आतां कोणी महाजन म्हणाला 'हा मार्ग धर ' तर युधिष्ठिर म्हणणार 'ठीक.' उद्यां दुसरा महाजन म्हणाला 'तो मार्ग धर ' तरीही युधिष्ठिर म्हणणार ठीक. बुद्धिहीन सांगकाम्यानें एकाच महाजनावर निष्ठा ठेवली तरीही मोठीं कार्यें घडूं शकतात. पण युधिष्ठिराची गति अशीही नव्हती. कारण जो ऋषि, मुनी, गोसावी, जोगडा, धूर्त, म्हातारा, दूत, मित्र, नातेवाईक त्याला कांहीं म्हणेल तें सारेंच त्याला खरें दिसे. 'शहाण्याचें तिठायीं ' असें त्याचें होत असे. मनुष्याच्या ज्ञानाची परमावधी झाली म्हणजे शेवटीं तो 'नेति नेति ' हें शेवटचें ज्ञान शिकतो. म्हणजे 'हेंहीं नाहीं आणि तेंहीं नाहीं ' अशा ठिकाणीं त्याची बुद्धि येऊन पोचते. शेवटीं ब्रह्म म्हणजे काय तें हाताला न लागतां आपणास कांहींच ज्ञान नाहीं असें ज्ञान होतें. ब्रह्मचिंतनाच्या मार्गांत या अज्ञानी ज्ञानाची काय किंमत असेल ती असो. पण असा अस्थिर बुध्दीचा अडाणी माणूस भारतीय युध्दाचें जगड्व्याळ व्यावहारिक अावडंबर आपल्या खांद्यावर तोलूं शकणार नाहीं याचें ज्ञान कृष्णास होतें. युधिष्ठिराच्या पोटाचाच प्रश्न असता तर कृष्ण हात धुवून केव्हांच मोकळा होता. पण प्रश्न इतका सरळ नसून त्यांत अनेक धागेदोरे गुंतलेले होते.

कृष्णाची आत्या कुंती ही युधिष्ठिराच्या नादानीमुळें दानावर जगत होती. त्याची बहीण सुभद्रा ही सक्तीचा माहेरवास भोगीत होती. त्याचा लाडका भाचा अभिमन्यू याचें सबंध भविष्य समोर उभें होतें; त्याला हक्काचें घरही नव्हतें. राजोपभोग भोगण्यास पात्र असा कृष्णाचा सखा अर्जुन हा हिजड्याच्या दुर्दशेप्रत गेला होता. आणि सर्वांत प्रथम म्हणजे कृष्णाची लाडकी मैत्रिण द्रौपदी हिचा अपमान झालेला असून त्याची भरपाई अजून व्हावयाची होती. तिचे केश बांधले जावयाचे होते.



आणखीन् कांहीं दिवस त्यांना अशाच स्थितींत राहूं द्या, बरं का.........

या सर्व गोष्टींत कृष्णाचे मनोबंध गुंतले होते. हे मनोबंध युधिष्ठिराच्या हातीं सुरक्षित रहातील अशी खात्री नव्हती. तो पांच गांवाची भीक मागण्यापर्यंत खालीं कोसळला होता. धृतराष्ट्रानें आणली एखादा तदू पाठवून त्याच्या डोक्यांत आणखी शांतिपाठ ओतला असता तर तो लेंचापेंचा माणूस पार लटपटणार होता.

महाभयंकर संकट म्हणजे या शांतीच्या उपदेशानें भीमाचें डोकें बिथरत आलें होतें. अर्जुनाची बुद्धि भ्रमित झाली होती. टेकणाच्या संगें हिरा भंगावा तसे धर्माच्या शांतिपाठानें हे वीर ढळत होते. हे पुरे ढळते म्हणजे प्रश्नच संपता. मग दुःशासनाची छाती फोडणार कोण आणि द्रौपदीची वेणी घालणार कोण ? विटंबना टाळावयाची असेल तर युधिष्ठिरास बाजूला सारून सत्ता कोणीतरी समर्थ माणसानें हातीं घ्यावयास हवी होती हें कृष्णानें ओळखलें आणि ती हातीं घेतली.

'कृष्ण सांगेल तें खरें. कृष्ण म्हणेल तो सेनापती' अशी नाहींतरी युधिष्ठिराची वृत्ति होतीच. त्यांतला औपचारिकपणा कृष्णानें

गुंडाळून ठेवला आणि यापुढें मी सांगेन तेंच घडेल असें मनोमन ठरविलें. युधिष्ठिरास हें सांगणें म्हणजे कालव्यय हें जाणून त्यानें प्रसंग येईल तेव्हां युधिष्ठिरास वांकवूं असें योजिलें. बोलण्यांत हंशील नव्हताच ? कार्य तें करून दाखवावयाचें होतें. तें करण्याचा निर्णय कृष्णानें घेतला होता. तो सर्वाधिकारी झालेला होता.

याच कारणानें तो दूत म्हणून गेला तेव्हां त्यानें बोलणें केलें तें सर्वाधिकारी म्हणून केलें. युधिष्ठिराची लाचारी उधळून उद्दामपणाचें वर्तन ठेवलें आणि दुर्योधनास ठेंचून चेतावलें. युद्ध टळण्याचा संभव शून्य टक्के होता तोही उधळून लावला आणि युद्धारंभाची तिथी ठरवूनच तो परतला. तूं आमच्या पक्षास ये. मी सर्व पांडवांस तुझे दास करीन असें आपल्या अखत्यारांत त्यानें कर्णास सांगितलें. कारण युद्धिष्ठिर राजा व्हावयास जेवढा नालायक होता तेवढाच कर्ण लायक होता.

आपल्या सामर्थ्याची जाणीव होती म्हणून कृष्णानें या सर्व गोष्टी केल्या आणि त्या त्याच्या व्यक्तित्वास शोभून दिसतात. त्यानें उचित आणि अटळ अशावेळीं सर्वाधिकार आपणाकडे घेतले आणि ते पार पाडून दाखविले. आपण हे अधिकार घेतले आहेत हें त्यानें वेगळ्या संबंधात पण स्पष्टपणें सूचित केलें आहे. धृतराष्ट्राशीं बोलणें सुरू करतांनाच तो त्याला म्हणाला आहे, 'तूं आपल्या पुत्रांवर ताबा ठेव. पांडवांचें नियंत्रण माझ्या हातांत आहे.' 'पुत्रान् स्थापय कौरव्य स्थापयिष्यामि पांडवान्.' आपण पांडवांचे दूत नसून नियंते आहोंत हें त्यानें इथें स्पष्टपणें जाहीर केलें आहे. कारण या वेळीं तो स्वयंनियुक्त सर्वाधिकारी आहे.

## एतं वा मामहं वेनान् ::॥३०॥

## विराट रूप दर्शन

एखादी अज्ञ माता अति लाडानें आपल्या पुत्राचें नुकसान करतें तसें भक्तांनी देवाचें नुकसान केलें आहे. कृष्णाचें धोरण, राजकारण, शौर्य, धिटाई इत्यादी गुणांवर विराट प्रकाश पाडून त्याचें लोकविलक्षण बुध्दिवैभव प्रकट करणारा प्रसंग भक्तांनीं विराटरूपाच्या स्वरूपांत वर्णून त्याचा पार चुथडा करून टाकला आहे.

कृष्णाच्या आयुष्यांतील नाट्यमय प्रसंगांतील हा एक परमश्रेष्ठ प्रसंग होय. कौरव-पांडवाचें युध्द व्हावयाचें ठरलें. उभय पक्षांनीं दुसऱ्या राजांकडे मदत मागावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें चोहींकडे आमंत्रणें निघालीं आणि कृष्णाची मदत मागण्यासाठीं व्यक्तिशः दुर्योधन आणि अर्जून हे एकाचवेळीं हजर झाले.

पुढें मदत देण्याचा प्रसंग आला तेव्हां दुर्योधन म्हणाला,

—मी तुझ्याकडे अगोदर आलों आहे. अगोदर आलेल्यास मदत करावी असा धर्म आहे. तेव्हां तूं मलाच मदत कर.

कृष्ण सगळ्या धर्मांचें पाणी कोळून प्यालेला. तो शल्यासारखा वेडा नव्हे. युधिष्ठिरास मदत करण्यास निघालेल्या शल्यास फसविण्यांत दुर्योधन यशस्वी झाला होता. पण आतां गांठ कृष्णाशीं होती. त्यामुळें दुर्योधनकृत धर्म-विवेचन ऐकून त्याला कृष्ण म्हणाला,

तूं अगोदर आला असशील. पण मी अगोदर अर्जुनास पाहिला. तेव्हा धर्मानें दोघांचाही हक्क समान झाला. मी माझ्या सामर्थ्याचे वांटे करतों. एका बाजूस माझी सेना आणि एका बाजूस मी. अर्जून तुजहून लहान आहे. लहानानें आपली इष्ट वस्तु उचलावी असा धर्म आहे. तेव्हां अर्जुनाला पहिली निवड करून दे.

यावेळीं दुर्दैवानें अर्जुनाची बुद्धि स्थिर राहिली. त्यानें कृष्णाची निवड केली. ही बुद्धि अस्थिर रहाती तरीही त्यातून अर्जुनास सावरावें कसें याचें सामर्थ्य कृष्णास होतेंच. क्षणोक्षणीं प्रसंगोचित नवा धर्म काढावयास तो समर्थ होता. परंतु इथें तो प्रसंग टळला. अर्जुनानें कृष्णाची निवड केल्यावर दुर्योधन कृष्णाची सेना आणि तिचा सेनापति कृतवर्मा यांना घेऊन आनंदानें नाचत निघून गेला.

पण हा नाच योग्यवेळीं त्याचें घाऊल मोडणारा ठरणार होता. त्या मूर्खास अशी अक्कल नव्हती कीं कृष्णाचें हें सामर्थ्य आपण आपल्या घरांत आणून ठेवीत आहोंत; जेव्हां प्रसंग येईल तेव्हां हें सैन्य आपला गळा कापून कृष्णाचें रक्षण करावयास मागेंपुढें पहाणार नाहीं.

कृष्ण जेव्हां दौत्य करावयास युधिष्ठिराकडून निघाला तेव्हां तो काय वेडा होता ? मुळींच नाहीं. सर्व परिस्थितीची यथार्थ जाणीव एकट्या त्यालाच होती. त्याची बुद्धि स्थिर होती. मार्ग स्पष्ट होता. आपणास काय करावयाचें आहे हें ज्याप्रमाणें त्याचें ठरलेलें होतें त्याचप्रमाणें दुर्योधन काय करूं शकेल याचेंही त्याला यथार्थ ज्ञान होतें. आणि त्याचा उपायही त्याला ठाऊक होता.

आपण साधेसुधे दूत नसून पांडवाचें सारें बळ आहोंत; ही गोष्ट जशी आपणास माहीत आहे तशी दुर्योधनासही माहीत आहे; दुर्योधन आपणास धोका पोहोचवून पांडवांचा नाश करण्याची संधी सोडणार नाहीं

हें पुरतें जाणूनही कृष्ण कौरवांच्या गुहेंत उद्दामपणें आणि आत्मविश्वासानें शिरला तो काय वेडा म्हणून नव्हे.

कौरव आपले तृणही वाकडें करूं शकणार नाहींत याची त्याला जाणीव होती. आणि यासाठीं हस्तिनापूरला पोचल्यावर त्यानें आवश्यक ती सर्व काळजी घेतली होती. महावीर सात्यकी हा कृष्णाबरोबर होता; आणि कृष्णाच्या धोरणास सहकार देऊन तें कृतींत उतरण्यास तो पूर्णपणें समर्थ होता.

त्यामुळें हस्तिनापुरांत जातांच दुर्योधनाला निःशंकपणें ठोकरावयास कृष्णानें सुरवात केली. आजपर्यंत पांडवांकडून बोलणें यावयाचें तें दोन लाचारीचें. तेंच ऐकण्याची दुर्योधनास संवय. त्यामुळें आपल्या उद्दामपणास तोडीस तोड असें कृष्णाचें बोलणें आणि आपल्या स्वागतास त्यानें मारलेली लाथ पाहून दुर्योधन हडबडला. कृष्णास अपाय करावा असा आधींच ठरविलेला बेत त्यानें पक्का केला. पण कृष्ण शंभर दुर्योधनांची बारशीं जेवलेला होता. त्यामुळें जेव्हां सभेंत बोलणें व्हावयाचें तेव्हां कृष्णानें आपला सेनापती कृतवर्मा याकडून सर्व सभा साफ वेढून टाकलेली होती. हें काम सात्यकीनें अशा गुप्तपणें केलें होतें कीं, खुद्द दुर्योधनास त्याचा पत्ता नव्हता. आपलेंच सैन्य भोंवतीं फिरत आहे अशा भ्रमांत तो होता. आपल्या गळ्याभोंवती फांस बसला आहे आणि कृष्णाची पापणी लवतांच सात्यकी तो फांस आवळणार आहे याची त्याला कल्पनाच नव्हती.

त्यामुळें सभेंत व्हावयाच्या त्या गोष्टी होऊन दुर्योधनाची सूचक हालचाल चालू झाली, तेव्हां आपली पापणी लववून, कौरवांना 'आ' वासावयासही वेळ न देतां सारी व्यवस्था करून, अट्टाहासानें गर्जुन खदखदां हंसत कृष्ण म्हणाला.

—मूर्खा, मोहवश होऊन तू मला एकटा समजत आहेस. मला पकडूं पहात आहेस. पण यावेळीं माझ्या सेनेकडून तू चौफेर वेरला गेला आहेस याची तुला जाणीव नाहीं. धृतराष्ट्रा तुझा हा मूर्ख कारटा मला धरूं पहात आहे. तुला ताकद असेल तर याला आज्ञा दे; आणि मग तमाशा पहा. (एते वा मामहं वैनान्) हे मला पकडतात कीं मी यांना पकडतों तें तुला कळेल. तूं आंधळा आहेस. तुला दिसूं शकत नाहीं. म्हणून मी माझ्या मुखानें माझें सामर्थ्य वर्णून तुला ही दृष्टि देत .आहे. या तुझ्या सभेंतील प्रत्येक माणसाला घेरून यावेळीं माझीं माणसें उभी आहेत. तुम्ही यावेळीं माझ्या दाढेंत आहांत. मी इथेंच तुमचा नाश करून हें युद्ध संपवूं शकतो. पण मला पापकर्म करावयाचें नाहीं म्हणून मी तुम्हांला जिवंत सोडीत आहे. असें म्हणून आणि सात्यकी व कृतवर्मा यांचा हात धरून, श्रीकृष्ण विजयी वीराप्रमाणें पावलोपावली दुर्योधनाचा अभिमान चेंचीत सभेबाहेर चालता झाला.

त्याची चातुरी, द्रष्टेपणा, बुद्धिमत्ता, नियोजन धोरण इत्यादी शेंकडो गुणाच्या या अनपेक्षित विराट दर्शनानें चाट पडलेले कौरव तो सभेबाहेर निघून गेल्यावर बऱ्याच वेळानें शुद्धीवर आले.

—क्रमशः

● ● ●



*नाट्यांत संसार नसला तरी आमच्या संसारांत नाट्य आहे ते हे असं-एक पात्री, अखंड प्रयोगी !*



# रॉँग मॅन शो

—रसिक मनोहर

'श्री. व सौ. मोरेश्वर बावळे यांना—

विद्वता आणि शालीनता ह्यांचा अजोड मिलाफ असलेलीं माणसें हल्लीच्या ढोंगी जगांत दुर्मिळ होत चाललीं आहेत. परंतु हा मिलाफही कसोशीनें टिकवून धरणारी कांहीं मोजकीच अशीं भाग्यवान माणसें मला माझ्या आयुष्यांत भेटलीं आहेत. त्या भाग्यवंतांच्या शिलालेखांत आपणां उभयांचें नांव मला निश्चितच कोरावें लागेल.

—सआदर सप्रेम भेट

—'दिगू कऱ्हाडे'

दीपावलीनिमित्त आम्हां उभयतांचं करण्यांत आलेलं दिगू कऱ्हाडेकृत अभीष्टचिंतन ! आमच्या ऑफिसांत वल्लीच फार–व्यक्ती कमी. त्यांतील प्रमुख वल्ली म्हणजे दिगू कऱ्हाडे वास्तविक स्वारी लेजर कीपर, पण झुरत होती लेखक होण्यासाठीं. आपण हातांत ( ऑफिसची ) लेखणी धरली आहे ती लेखक होण्यासाठीं ही ईर्ष्या. लेजरचा ट्रायल बॅलन्स जुळविण्यापेक्षां कविता जुळवण्याकडे कल अधिक–अगदींच निरुपद्रवी प्राणी असा केंविलवाणा कटाक्ष टाकून ज्याच्या वाटेला चुकूनसुद्धां कधीं गेली नाहीत अशा 'शिशू'च्या गीतापासून तो अलिकडेच फार भाव वधारलेल्या समर–गीतांपर्यंत ! काम बळेंच तुंबवून, साहेबाला कोंडींत पकडून ओव्हरटाईम काढायचा हा इतर कारकुनांच्या डोक्यांत तिरकस आशय तर ह्याच्या डोक्यांत सघन आशयाची लघुकथा. साहेबाला मस्का लावून, इतर सहकाऱ्यांना टांग मारून ग्रेड कशी मिळवायची हा ऑफिसांतला ज्वलंत संघर्ष ह्याला कधींच मानवला नाहीं. हा आपला सूक्ष्म व हृदयस्पर्शी संघर्षाची कादंबरी रचण्यांत दंग ! फार काय ऑफिसचा लंच टाईम सुद्धां इतर मंडळी वात्रटिका, चाऱ्कळिका ह्यांत मश्गुल असतांना, ही स्वारी मनोविश्लेषणात्मक भेदक व हृदयद्रावक एकांकिका जमविण्यांत घालवी. अक्षरशः ऑफिसानार्जी ( 'दिसानार्जी' च्या धर्तीवर ) लिहित असे. ऑफिसचा ( पगाराच्या हिशोबांत ! ) अमूल्य वेळ हा असा सत्कारणीं लावायचा. कामांतील अस्सल सच्चाईपेक्षां निवेदनांतील सच्चाई व विषयाच्या वेगळ्या अस्सलपणाकडे अवधान अधिक ! परंतु दिगू कऱ्हाडेच्या तरल संवेदनाशील सृजनशक्तीपेक्षां रेड्डीसाहेबांची अवलोकनशक्ति सूक्ष्म व तीक्ष्ण. त्याच्या कामांत कलापूर्ण आविष्काराचा साक्षात्कार त्यांना कधींच झाला नाहीं. त्याच्या कामातील बारीक सारीक तांत्रिक चुका दाखवून, योग्य त्या सुधारणा घडवून न आणल्यास शिस्तभंगाचा इलाज करण्यांत येईल असा ( कान ) मंत्र दिला जाई. त्याच्या कामाचा समाचार घेतांना, कामाचा विचका केला ही रेड्डीसाहेबांची नेहमीची श्रुतिका. ह्या श्रुतिकेंत अवगुण असा कीं, एकंदर निवेदनांत साक्षेप कमी. श्रुतिका भरघोस होतां होतां पाल्हाळांत ताणली जायची. विस्तारत रहायची. रेड्डी ( यो ) ची ही श्रुतिका सारं ऑफिस चुपचाप ऐकत असतां हा बेटा नख्खपणें रेडियोसाठीं करूण-रम्य भावगर्भ श्रुतिका जुळवित असे. असा हा शारदादेवीचा एकनिष्ठ सेवक !

त्याच्या ह्या उठाठेवीची इतरांना खंत ना खेद, पण मी मात्र धास्तीच घेतली होती. त्याच्या लिखाणाचा पहिला वाचक मी ! मला साहित्यांतलं बरंच कांहींतरी समजतं अशी आपली त्याची ( गैर ) समजूत ! त्याचं लिखाण वाचून मी कांहीं मार्मिक सुधारणा सुचवाव्या अशी त्याची किमान अपेक्षा. 'सॉरी रॉँग नंबर !' असं किती वेळां



अनुक्रमणिका

जीव तोडून सांगितलं तरी त्याला पटत नसे, उलट हा माझा विनय वाटे. कंपनीचे किचकट हिशेब तपासून मी (बरे वाईट) शेरे मारूं शकतो, तर गिचमिड अक्षरांतलं त्याचं लिखाण म्हणजे किस झाडकी पत्ती असा त्याचा रोकडा सवाल असे! आमचा नेहमीचा 'चेक्ड अॅन्ड फाऊन्ड करेक्ट' हा शेरा ऑफिसच्या कामांत सोयीचा असला तरी साहित्य समीक्षणांत अगदींच गैरसोयीचा. कलेच्या क्षेत्रांत 'फाऊन्ड करेक्ट' सांगणारे समीक्षक सध्या दुर्मिळ झाले आहेत—औषधाला शोधून सापडत नाहींत! उलटपक्षीं कलाकारानाच ह्याचं प्रिस्क्रिप्शन ऐकावं लागतं. त्याच्या माझ्यावरील श्रद्धेला तडा जाऊं नये म्हणून मी त्याचं लिखाण वाचण्याची शक्यतो तसदी घेऊन, विनोदी असेल त्याला बाष्कळ, उत्कट असेल त्याला भडक, भावस्पर्शी असेल त्याला अतिरंजित असें (हाडाच्या टीकाकाराच्या) ऐटींत ठरवीत होतों. कधीमधीं लघुकथेची एकांकिका वा एकांकिकेची रेडियोसाठीं श्रुतिका करा असा—आपल्या बापाचं काय जातंय् ह्या सुखकर हमीनं—ठोकून देतो ऐसाजे पद्धतीचा आगाऊ सल्लाही देत असे! बरेचदा तो आमच्या घरीं लेखनाचं बाड घेऊन येई. त्यावेळीं आमची सौ. सुद्धा चर्चेत भाग घ्यायची—म्हणजे लाक्षणिक अर्थानें (माझ्या) हाताला हात लावून 'मम' म्हणायची. पण तेही अशा शैलींत व रुबाबांत कीं, उषावहिनी, अनूताई इत्यादींचे वनिता 'विश्वां'तले सल्ले फिके पडावेत! वरतीं चहा-फराळ देऊन त्याला सक्रिय सहानुभूती दाखवायची. कोणे एकेकाळीं दिगू भावजीनं (दिगू कऱ्हाडेला आमच्या घरांत मिळालेलं प्रमोशन!) एखादं पुस्तक वगैरे प्रसिद्ध केलंच तर तें पुस्तक आम्हा उभयतांना अतिशय अचंब्यानें, सकौतुक आदरानें (इत्यादि, इत्यादि!) अर्पण करण्यांत येईल अशी हिनं खुणगांठ सुद्धां बांधून टाकली होती. एका परीनं 'ती' अर्पण-पत्रिका हिनं रिझर्व्ह करून टाकली होती!

आणि म्हणूनच दिगू कऱ्हाडेचं ते दिवाळी अभीष्टचिंतन कार्ड हिला फुल ना फुलाच्या पाकळीसारखी आगाऊ अर्पण-पत्रिकेची रंगीत तालीम वाटली! मला मात्र ब्रह्मांड आठवलं. झांकली मूठ उघडी पडण्याची वेळ आली. फक्त लेखणीनेंच गाणाऱ्याला गायला बसवावं तशी माझी स्थिती झाली. ऑफिसातल्या सिक्नोट वा रजेच्या अर्जांत (तोच तो) मजकूर सुद्धां मला कधीं धड लिहितां आला नाहीं. त्यांत आणखी, 'तुम्ही सुद्धा असंच कांहीं तरी सुंदर लिहा—' असा होम मिनिस्टरचा हुकूम! कुठंतरी नाट्य-टीकाकार म्हणजे यशस्वी नाटककार होण्याचा फॉम्युला दुसऱ्या कोणी सांगायला नको असं म्हणतात. परंतु मी आतापर्यंत नुसतं समीक्षकाचं नाटकच करीत आलों होतो. आणि त्या नाटकांनेंच माझ्यापुढें नाट्यपूर्ण समस्या उभी केली होती! शेवटीं, उत्तरादाखल काहीतरी 'इनोदी' लिहायचं ठरवलं—निदान खरडलेलं इनोदाच्या नांवाखाली खपेल हा विश्वास! स्वतःला बावळटपणाचा धनी केला (माझ्या बाबतींत तो कसा अगदीं रेडीमेड होता, एवढासुद्धा उसना आणायला नको!) आणि त्या बावळटपणाला सौ. च्या (अक्कल) हुषारीची, जहांबाज-पणाची फोडणी दिली कीं इनोदी लिहिणं फारसं कठीण नाहीं हें माझं (वाचिक) अनुभवावरून झालेलं मत! त्यांतून दिगू कऱ्हाडेला विनोदाचं इंद्रिय का कायसंस् म्हणतात तें नसल्यामुळें, त्यालाही (माझ्या) विनोदाचा मासला दाखवावा म्हणून मी ऐटींत पत्र लिहायला बसलों.

श्री. दिगू कऱ्हाडे यांस—

दिवाळी अभीष्टचिंतनाबद्दल हार्दिक धन्यवाद. नेमेचि येणाऱ्या दिवाळीबद्दल यंदा विशेष कौतुक वाटण्याचं कारण म्हणजे आपल्या शुभेच्छा.

विद्वत्ता आणि शालीनता ह्या माझ्या दोन (नसलेल्या) गुणाचा आपण आवर्जुन केलेला उल्लेख पहाताच खरं सांगायच म्हणजे मला पुष्कळ बरं वाटलं! अर्थात् ह्यात सत्याचा भाग किती व आपल्या सौजन्याचा किती अशीही (कु)शंका मनाला चाटून गेली. 'विद्वान आहेस झालं!'—असं थट्टेनं वा कुचेष्टेनं कां होईना म्हणून घेण्याचा (दुर्मिळ) योग मला कधींच आला नसल्याकारणानें आलेल्या प्रशंसेची अपूर्वाई! एरव्ही अंगीं पाणी नसण्यात अथवा बावळटपणांत जमा होणाऱ्या माझ्या गुणांवर शालीनतेचं पांघरूण घालण्याचं औदार्यही आपलंच!

आम्हा उभयतांना आपली भेट आवडली. कारणं अर्थात्च नेहमीं-प्रमाणें निराळीं! (ह्या बाबतीत सुद्धां आमचं 'दु' मत असावं ना?) आपल्या विद्वत्तेची बूज 'ह्यांनीं' ठेवली नाहीं तरी तुम्ही ठेवली म्हणून हिला आनंद! (कुठलाही सुबुद्ध व सावध नवरा गाफील क्षणीं सुद्धां आपल्या बायकोच्या विद्वत्तेची तारीफ करीत नसतो. प्रपंच नेटका नसला तरी नेटानें करण्यासाठीं ह्या सावधगिरीची आवश्यकता!) माझी शालीनता सौ. ला कधींच पटली नाहीं. 'तुम्हाला शालीन म्हटलं म्हणून हुरळून जाऊं नका' असा सौ. चा इशारा. खरं तर नवऱ्याला मुठांतच काय पण प्रसंगीं चिमटींत ठेवूं पहाणाऱ्या बायकांच्या महत्त्व-कांक्षेला सक्रिय मदत करणाऱ्या नवऱ्याची शालीनता नसली तरी लीनता लक्षांत यावी एवढीच माफक मागणी असते समस्त नवऱ्यांची! उलटपक्षीं मी अगदीं पक्का आहे अशी सौ. ची खात्री. जाऊं द्या झालं. घरोघरीं मातीचेच नवरे (आणि कृतीच्याच बायका!) तिच्या विचाराबद्दल आणि माझ्या विकाराबद्दल आम्हांत असा मतभेद असल्यामुळें आमचा संसार खमंग झाला आहे ह्यात शंकाच नाहीं. असं असलं तरी आमचा 'अवघाचि संसार' 'सुखाचा नि आनंदे भरीन' झाला आहे ह्याचं कारण एकच—तिची विद्वत्ता. आणि माझी (विच्चारी!) (शा) लीनता! विद्वत्ता आणि शालीनता ह्यांचा अजोड मिलाफ आमच्या संसारात आहे तो हा असा!...

इतक्यात सौ. ने प्रवेश केला—समंधाची आठवण काढतांच समंध यावा तसा!

'काय चाललंय...?' आरोपीच्या वकिलाच्या दरडावणींत सौ. चा प्रश्न.

'कांही नाहीं, आपलं हे—त्या दिगू कऱ्हाडेला पत्र लिहीत होतो' मी. माफीचा साक्षीदार-

'माझी उडवली असणारच भरपूर...सौ. चा (उगाचच) संशय आणि, 'म्हटलं कोंबडं झाकलं म्हणून तांबडं फुटायचं रहात नाहीं. समजलात. नवरे, नवरे, नवरे! असले कसले हे कसाब नवरे!' हा कृत्तिकेचा (अस्थानीं) कल्लोळ!

तिनं माझ्या पुढ्यातला कागद खसकन् ओढून घेतला नि वाचा-यला सुरवात केली. मी मात्र 'दुर्गे दुर्घट भारी, तुजविण संसारी—' ही आरती मनातल्या मनात आळवूं लागलों.

"दांभिकता, ढोंग, खोटेपणा—दाय नेम इज नवरा!" माझ्या अंगावर कागद भिरकावून देत कडाडली राधाबाई!

" तुला जर पसंत नसेल तर मी हा कागद फाडून टाकतो. नाहीं-तरी संसार ही एक तडजोड आहे " मी-गोगलगाय ( नि पोटांत पाय सौ.च्या मतें ! )

" हुं ! म्हणे संसार ही एक तडजोड आहे. म्हणजे पुरुषांनीं संसारांत तडे पाडायचे आणि बायकांनीं ते एक सारखे जोडत रहायचे, असंच कीं नाही ?" नवरा काय म्हणेल ह्याची पर्वा न करणारी उल्का !

" अग, एवढ्या तेवढ्या कारणावरून तूं नेहमी वितंडवाद घालत बसतेस, तेव्हां म्हटलं अशा गंमतीनं तुला जरा नीट करावी " मी , नीट करावी ' दयेची याचना करणारा, जन्मठेपेची सजा झालेला चतुर्भुज.

' कोणं कुणाला नीट करणार, देव जाणे ! फडकंही मळकं अन् मडकंही मळकं ! एकानं दुसऱ्याला नीट करायला जावं तर फडक्याचा मळ मडक्याला आणि मडक्याचा मळ फडक्याला ! ' आमचं खडाष्टक अबाधित राखणारी रागिणी.

हा नित्याचाच अनुभव. कृत्तिका, रागिणी, त्राटिका इत्यादींचा आमच्या सौ. च्या वन वुमन शोचे प्रयोग-मागणी असो वा नसो-एकामागून एकसारखे चालू असतात ! नाट्यांत संसार नसला तरी आमच्या संसारांत नाट्य आहे तें हें असं-एकपात्री, अखंड प्रयोगी ! बाहेरचे लोक आंत येण्यासाठीं आतुर असतात, तर आंतले लोक बाहेर जाण्यासाठीं धडपडत असतात. अशा त्या विचित्र सांपळ्यांत मलाही एक 'भूमिका' आहे-पण तो रॉंग मॅन शो आहे ! दुर्दैव हेंच कीं, कुठल्यातरी बेसावध क्षणी मी 'एन्ट्री' तर घेऊन चुकलो आहे, पण साधं 'स्वगत' म्हणायची सुद्धां चोरी ! पुरुष हा क्षणाचा नवरा असून अनंतकालचा गुलाम आहे हे ब्रह्मचारी दिगू कन्हाडेच्या कुठल्यातरी लेखांतलं वाक्य. पण असलीं तत्त्वज्ञानं विवाहापूर्वीच सुचतात. आधीं जाते अक्कल नि मग येते बायको ! रंगभूमीवर एखादं गाणारं पात्र तासन् तास सारखी तानबाजी करीत असतांना दुसरं पात्र पायाला मुंग्या आल्या-प्रमाणें एकाच जागीं चुळबूळ करीत उभं रहातं तशी माझी स्थिती झाली आहे. एकुलती एक बाई नेरच कांहींतरी वेडेवाकडे हातवारे व हावभाव करून एकसारखी बडबडते आहे, बडबडते आहे आणि दुसरं कांहींच होत नाहीं असा हा भयाण एकपात्री खेळ आहे ! अशा ह्या ' असार पसारा शून्य संसार सारा ' मधून ज्या दिवशीं मला ' एक्झिट ' मिळेल, त्या दिवशीं मला खरोखरच ' प्रभु अजि गमला, मनिं तोषला ' असं वाटेल. तोपर्यंत आहेच आमच्या नशिबीं आळवीत बसायचं-' धन्य तूंचि कांता !

● ● ●

# माणुसकीच्या शत्रुसंगें युद्ध आमुचें सुरू...



*युद्ध आघाडीवरील वीरांच्या या शौर्यकथा. विजयगानासाठीं सज्ज असलेल्या बहादूरांच्या गौरवाला वाहिलेलीं हीं दोन पानें...*

—चंद्रकांत गुप्ते

### बहादूर बचीसिंग

नेफा विभागांत चिन्यांच्या हातांतून स्वतःची मुक्तता करून घेण्यासाठीं कुमॉन रेजिमेन्टमधील बचीसिंग या जवानानें जें धाडस केलें व प्रसंगावधान दाखविलें तेंहि असेंच कौतुकास्पद आहे. हा शूर जवान एकाकी पडला असता चिन्यांच्या हातीं सांपडला होता. लोहित विभागांतील मॅकमोहन रेषेवरील किबितू या छोट्या भारतीय ठाण्यावर चिन्यांनी एके दिवशीं रात्रीं ११ वाजतां अकस्मात हल्ला केला. हा हल्ला होण्यापूर्वी बचीसिंग याला एक महत्त्वाचा संदेश देऊन दुसऱ्या ठाण्यावर पाठविण्यांत आलें होतें. तो या कामगिरीवर गेला असतानांच इकडे या ठाण्यावर हा हल्ला झाला व आपले जवान तेथें फारच कमी असल्यामुळें, त्यांनीं कडवा प्रतिकार करून अधिक चांगल्या रीतीनें चिन्यांना तोंड देण्यासाठीं चांगल्या संरक्षण जागांपर्यंत माघार घेतली. या बदलत्या परिस्थितीची कांहींच कल्पना नसल्यामुळें बचीसिंग हा उत्तर रात्री आपली कामगिरी पार पाडून तेथें गेला. तेव्हां बचीसिंगला एका कोपऱ्यांत तीन सैनिक बसलेले दिसले. लांबून ते कोण आहेत हें नीट पाहूं न शकल्यामुळें बचीसिंग आपला त्यांच्याजवळ गेला. तेव्हां त्या तिघा सैनिकांनीं बांगनेटें उगारून त्याला घेरलें. नंतर मग त्याला त्या तिघांनीं कैदी म्हणून नेण्यास सुरुवात केली. बचीसिंगनें त्वरेनें परिस्थितीचा आढावा घेतला. घनदाट जंगल, कपारी, खडक व डोळ्यांत बोट घातलें तरी दिसणार नाहीं इतका भयंकर अंधार या गोष्टी आपल्याला साथ देऊं शकतील हें त्याच्या चटकन लक्षांत आलें. आणि मग विद्युल्लतेच्या वेगानें तो वळला व ते तिघे चिनी सैनिक कांहीं हालचाल करण्यापूर्वींच त्यांना गोंधळांत टाकून तो पळाला. एका चिनी सैनिकानें त्याच्यावर गोळी झाडली पण बचीसिंगानें एका खडकाच्या आड आडोसा घेतला. तरीहि त्याच्या दंडाला गोळी लागलीच. लगेंच त्या चिन्यांनीं त्याचा पाठलाग केला. परंतु लपत, छपत त्यांना हुलकावणी देत व रांगत रांगत जाऊन शेवटीं या बचीसिंगानें त्या तिघां चिन्यांना गुंगारा दिला. त्यानंतर लोहितच्या टेकड्यांतून मार्ग काढीत काढीत तो शेवटीं वालॉंगला येऊन पोहोंचला. तेथें त्याचें उत्साहानें स्वागत करण्यांत आलें.

● ● ●

### हा परमवीर चक्रधारी

लडाख विभागांतील कोंग्मा ठाण्याच्या एका बाजूचें नेतृत्व जाट रेजिमेन्टचा नाईक मुन्शीराम याच्याकडे होतें. २२ ऑक्टोबर रोजीं सुमारें २५० चिन्यांनीं ठाण्यावर हल्ला चढविला. सतत दोन तास लढत दिल्यानंतर दारूगोळा संपला. तेव्हां तो आणण्यासाठीं मुन्शीराम आपल्या प्राणाची पर्वा न करतां खंदकाबाहेर पडला आणि दारूगोळा घेऊन परतत असतानांच तो शत्रूच्या गोळीला बळी पडला. यालाहि राष्ट्रपतींनीं बहादूरीचें वीरचक्र मरणोत्तर जाहीर केलें आहे.

जम्मू व काश्मीर मिलिशियामधील हवालदार तुलसीराम लडाखमध्यें रामू ठाण्यावर होता. १९।२० ऑक्टोबराच्या रात्रीं चिन्यांनीं ठाण्यावर हल्ला केला. तुळशीरामनें पराक्रमाची शर्थ करून लाईट मशिनगन चालवून शत्रूला थोपवून धरलें आणि शत्रुपक्षाचे किमान २०० लोक जायबंदी वा गारद केलें. ठाणें सोडावें लागल्यानंतर आपली मशिनगन घेऊन शत्रूच्या तावडींतून तो निसटला. राष्ट्रपतींनीं या वीरालाहि वीरचक्र देऊन भूषविलें आहे.

याच फौजेंतील सिग्नलमन धरमचंद लडाखमध्येंच थांगला ठाण्यावर होता. २७ ऑक्टोबरला सकाळीं चिन्यांनीं त्या ठाण्यावर तोफा डागल्या. ठाण्याच्या संदेशवाहनाचें काम त्यानें त्याचा सेट पार मोडून जाईपर्यंत चालविलें. पुढें एक खंदकांत शिरून त्यानें शत्रूशीं चार हात केले. अखेर लढतां लढतांच तो मरण पावला. त्यालाहि मरणोत्तर वीरचक्र राष्ट्रपतींनीं जाहीर केलें आहे.

दि. २० ऑक्टोबरची गोष्ट ! स्क्वाड्रन लीडर ॲर्नाल्ड सचिन्द्रनाथ विल्यम्स हा नेफामधील आपल्या एका ठाण्याची परिस्थिती पाहण्याकरितां हेलिकॉप्टरमधून गेला होता. चिन्यांनीं विमानाविरोधी तोफांनीं केलेल्या माऱ्यानें हेलिकॉप्टरची खराबी झाली तरीहि धीर न सोडता वीर विल्यम्सनें जवळच्याच एका ठाण्यावर हेलिकॉप्टर उतरविलें. याच विभागांत त्यानें आघाडीवरील आमच्या ठाण्यावरून अनेकदां जखमी व मृत सैनिकांना हेलिकॉप्टरमधून आणलें होतें. विल्यम्सचाहि राष्ट्रपतींनी वीरचक्र जाहीर करून गौरव केला आहे.

लडाखमधील अपकाट ठाण्याला वेढा दिला होता नि या ठाण्याशीं फक्त विमानानेंच संबंध ठेवणें शक्य होतें. या ठाण्याला रसद पोचविण्यासाठीं स्क्वाड्रन लीडर सूर्यकांत बधवार व फ्लाईट लेफ्टनन्ट कुप्पुस्वामी लक्ष्मी नारायणन यांनीं अनेक फेऱ्या मारल्या. दि. २४ ऑक्टोबरला अशाच एका फेरींत त्यांच्या हेलिकॉप्टरमध्यें बिघाड झाला व नदीच्या पात्रांत तें उतरविणें भाग पडलें. नंतर मदतीसाठीं आपल्या एका ठाण्याकडे जात असता त्यांना सभोंवारच्या डोंगरमाथ्यावर सुमारें दीडशें सशस्त्र सैनिक दिसले. हे सैनिक त्या दोघांना शरण यावयाला सांगत होते. मोठें प्रसंगावधान राखून ते हळूहळू आपल्या हेलिकॉप्टरकडे परतले आणि मोठ्या कौशल्यानें ते हेलिकॉप्टर चालवून आपल्या एका ठाण्यावर तें सुरक्षितपणें उतरविलें अशा प्रकारें त्यांनीं प्राण व बहुमोल सामुग्री वाचविली. या दोघांनी दाखविलेल्या या अतुल शौर्याबद्दल राष्ट्रपतींनीं त्यांना वीरचक्र जाहीर करून त्यांचा गौरव केला आहे.

मेजर धनसिंग थापा यांना मरणोत्तर परमवीरचक्र जाहीर करण्यांत आलें आहे तर चेपत्ता





अनुक्रमणिका

असलेले व बहुधा मारले गेले असावेत असा संशय असलेले सुभेदार जोगिंदरसिंग यांनाहि परमवीरचक्र राष्ट्रपतींनीं जाहीर केलें आहे. मेजर धनसिंग थापा हे जिवंत असल्याचें व चिन्यांच्या कैदेंत असल्याचें आतां समजतें.

●●●

## अतुल मनोधैर्य

महार रेजिमेन्टमधील जमादार भिमू कांबळे यानें अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत दौलतबेग ओल्डी येथून आपली सर्व शस्त्रसामुग्री कशी व्यवस्थित आणली त्याची हकिगतही मोठी रोमहर्षक आहे. कांबळेच्या या अतुलनीय कामगिरीमुळें तो आतां ' दौलतबेग ओल्डीचा वीर ' म्हणून सैन्यांत ओळखला जात आहे.

दि. २२ ऑक्टोबरच्या सकाळची गोष्ट ! थंडी कडाक्याची पडली होती. काराकोरम खिंडीनजीक असलेल्या दौलतबेग ओल्डी या ठाण्याचें चिन्यांपासून रक्षण करण्यासाठीं भिमू कांबळे इतर सैनिकांसह विमानानें तिकडे गेला. दौलतबेग ओल्डी येथे पोहोंचतांच त्या सैनिकांनीं लागलीच खंदक खणण्यास प्रारंभ केला व संध्याकाळपर्यंत खंदक खणून त्यांनीं मशिनगन्सचे मोर्चेहि बांधले. पण चिन्यांच्या प्रचंड सेनेपुढें थोड्याशा भारतीय सैनिकांचा टिकाव लागणार नसल्यामुळें अवजड शस्त्रसामुग्री नष्ट करून तें ठाणें सोडावें असा रात्रीं ८ वाजतां आपल्या जवानांना हुकूम गेला. परंतु भारतीय लष्कराच्या उच्च परंपरेनुसार जमादार कांबळे व त्याच्याबरोबरचे इतर सैनिक यांनीं मशिनगन्ससह आपली सर्व शस्त्रसामुग्री बरोबर नेण्याचें ठरविलें. रात्रीची थंडी मी म्हणत होती. परंतु तशा थंडीतहि ही मंडळी शस्त्रें खांद्यावर लादून दौलतबेग ओल्डी येथून निघाली. चार मैल अंतर चालून झाल्यावर कांहीं मशिनगन्स मागेंच राहिल्याचें जमादार कांबळे यांना आढळलें. लागलीच त्यानें आपले सहा सहकारी बरोबर घेतले व तो दि. २३ ऑक्टोबरला सकाळीं परत दौलतबेग ओल्डीला आला. यावेळीं चिन्यांचा मारा सुरू झाला होता. परंतु त्याची तमा न बाळगतां या लोकांनीं तेथें राहिलेल्या मशिनगन्स गोळा केल्या व ते परत आपल्या मार्गाला लागले. लौकरच ते त्यांच्या इतर सहकाऱ्यांना येऊन मिळाले. खांद्यावर अवजड शस्त्रें लादून हे सैनिक चार दिवस अन्नपाण्यावाचून मार्ग आक्रमित होते. रात्रीच्यावेळीं अंगाभोंवतीं ब्लँकेटें गुंडाळून उघड्यावरच ते भर थंडींत झोपत असत. एका मशिनगनचें वजन ९० पौंड असतें. अशी शस्त्रें लादून हे लोक चार दिवस चालत होते. चौथ्या दिवशीं एका हेलिकॉप्टरमधून त्यांच्यासाठीं कांहीं बिस्किटें व ब्लँकेटें टाकण्यांत आलीं. दोघां आजारी सैनिकांनाहि त्या हेलिकॉप्टरनें वर घेतलें. शस्त्रें टाकून द्या म्हणजे आणखी सैनिकांनाहि हेलिकॉप्टरमध्यें घेतां येईल असें त्यांना सांगण्यांत आलें. तेव्हां ' आमची काळजी करू नका, आमच्याजवळची हीं शस्त्रें घेऊन जा, आम्ही पायी येतो ' असें या लोकांनीं उत्तर दिलें. अशा तऱ्हेनें या लोकांनीं पांच दिवस चालून ९० मैलांचें अंतर कापलें व ते एका दूरच्या ठाण्यावर येऊन दाखल झाले.

> **भलत्या अफवा**
> **पसरवूं नका**

आपण आपलीं शस्त्रें तरी बरोबर घेऊन जाऊं किंवा येथेंच मरूं असा निर्धारच केल्यामुळें आपल्या हातून हा पराक्रम घडला असें जमादार कांबळे यानें नंतर विनम्रपूर्वक म्हटलें. भारतीय लष्कराच्या इतिहासांत या अतुल मनोधैर्याच्या उदाहरणानें आणखी एक पान लिहिलें गेलें आहे.

●●●

## धैर्यधर डॉक्टर सुब्बा

वॉलॉंगच्या लढयांत आणखी एक धैर्याचा मेरू पुढें आला. भारतीय जवान धारातीर्थी कोसळले असतां त्यांना जखमी अवस्थेंत ठेवून माघारी फिरण्यास धैर्यधर लेफ्टनंट सुब्बा या तरुण डॉक्टरानें नकार दिला व सैनिकांच्या सेवेसाठीं तो तेथेंच राहिला.

वॉलॉंगची ही लढाई म्हणजे तब्बल चार आठवडेपर्यंत निकरानें झुंज देणाऱ्या आमच्या ३२०० लष्करी अधिकाऱ्यांच्या व जवानांच्या शौर्याची स्फूर्तिदायक गाथा आहे. पंधरा हजार चिनी सैनिकांच्या एकामागून एक येणाऱ्या हिंस्र धडकांना चार आठवडयपर्यंत यशस्वीपणें परतवून लावण्याचें बिकट कार्य या जवानांनीं आपल्या शौर्याच्या जोरावर करून दाखविलें.

याशिवाय आघाडीवरील एका भारतीय जवानाच्या पत्नीनें आपल्या पतीच्या आदेशानुसार मलकापूर येथें जाऊन १८ ग्राम सोनें व ९१० ग्रॅम चांदी संरक्षण निधीला दिली.

या सर्व वीरपुत्रांचें मनोधैर्य व भारतमातेच्या संरक्षणासाठीं सर्वस्व पणाला लावण्याची जिद्द आणि शौर्य पाहिलें कीं ' संगरी वीराग्रणी जे धैर्य मेरू संकटी, जन्मले या भारती, गाऊं त्यांना आरती ' या महाराष्ट्र कवि यशवंतांच्या ओजस्वी काव्यपंक्तीचें स्मरण होतें.

●●●

३१ मार्च १९६३ पर्यंतच्या चतुर्थ मूल्यमापनानुसार जाहीर होणाऱ्या नफ्यांत तुम्हांला सहभागी होता यावें, यासाठी

# ३१ मार्च १९६३

या तारखेपूर्वींच तुमचा विमा उतरवा

३१ मार्च १९६३ पर्यंत नफ्यासहित आणि चालू स्थितींत असलेल्या पॉलिसींना

## चतुर्थ मूल्यमापनाच्या

निष्पत्तीनुसार होणाऱ्या नफ्यांत सहभागी होतां येणार आहे.

**३१ मार्च १९६३ रोजीं अगर त्यापूर्वीं जे विमा अर्ज पूर्ण झाले असतील आणि ज्यांचे रूपांतर पॉलिसीमध्यें झाले असेल असे विमा अर्जच फक्त बोनससाठीं पात्र ठरतील.**

आमची खात्री आहे कीं, तुम्हांला विमा उतरवायचा आहे. मग तो आतांच उतरवा, असा आमचा सल्ला आहे. शेवटची तारीख जवळ येईपर्यंत थांबाल तर कदाचित् विमा अर्ज पूर्ण होणार नाहीं. आणि त्यामुळें तो अर्ज बोनसलाहि पात्र ठरणार नाहीं. म्हणून आतांच आयुर्विमा एजंटची गांठ घ्या. म्हणजे सादर केलेला विमा अर्ज शेवटच्या तारखेपूर्वींच पूर्ण होईल याबद्दल अगदीं निश्चिंत रहातां येईल. ज्या पॉलिसींचें रूपांतर कमी प्रमाणांत कायम झालेल्या रकमेच्या (रिड्यूस्ड् पेड् अप्) पॉलिसींत झालें असेल किंवा ज्या पॉलिसी ३१ मार्च १९६३ रोजीं अगर त्यापूर्वी स्थगित झाल्या असतील अशा पॉलिसी बोनससाठीं पात्र ठरणार नाहींत. शुभस्य शीघ्रम् !

**आजच नफ्यासहित विमा घ्या आणि शेवटच्या आठवड्यांत होणारी गर्दी टाळा.**

## आयुर्विम्याला पर्याय नाहीं

Pratibha-ASP/LIC-SP-33

# ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन

दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमी २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.

—संपादक

## एका अननुभूत हुरहुरीचा प्रत्यय

'मातीचा घमघमाट सुटला की मी बेचैन होते. वास सहन होत नाहीं. जीव गुदमरून जातो. घमघमाटाच्या धुंदीने मी वेडी होईन अशी भीति वाटते मला...' इत्यादि मुकुंदाला गूढ वाटणाऱ्या वेणाच्या वाक्यात किती खोल अर्थ भरलेला आहे. किंबहुना 'मृत्तिकागंध' असें संस्कृतप्रचुर नांव मुकुंदाला अप्पासाहेबांनीं सुचविल्यानंतर त्याच्या बालमनाला हें कोडें उलगडल्याचा आनंद होऊन वेणाकडे धांव घेण्याच्या त्याच्या अधिर वृत्तीमागें नुसती एक बालसुलभ घटना कथन करण्याची लेखकाची इच्छा नाहीं, हें श्री. अच्युत बर्व्यांच्या 'मातीचा वास' ह्या कादंबरीचें वाचन करणाऱ्या सामान्य वाचकाच्याही ध्यानांत येईल. वर वर पानें चाळणाऱ्या वाचकाला प्रस्तुत कादंबरी ही वातावरणामुळें व भाषेमुळें प्रादेशिक वाटला आणि आतापर्यंत नागरी जीवनावर भरघोस कथा लिहिणाऱ्या बर्व्यांचा ह्या प्रदेशांत शिरण्याचा आवेश्कार, काय असा प्रश्न विवेचक समीक्षकाना पडला तरीसुद्धां कादंबरीला सुरवात केल्यापासून एका दमांत एकशें अठ्याण्णव पानें वाचण्याचा विक्रम करणाऱ्या वाचकाची अधिर वृत्ति पाहतांना ह्या कादंबरीच्या सर्वांगीण यशाची कल्पना पुरेपुर येते. बर्व्यांनीं आतांपर्यंत पुष्कळ कथालेखन केलें आणि त्यांच्या अनेक कथांनीं वाचकाच्या मनाची पकड घेतलेली आहे. पण त्यांच्या ह्या पहिल्याचे कादंबरीनें हा वाङ्मयप्रकार बर्व्यांना अनोखा नाहीं हें सिद्ध झालें आहे. मराठी साहित्यात पौगंडावस्थेचें हळुवार आणि यथार्थ चित्रण करणारी ही पहिलीच कादंबरी आहे असें म्हटलें तरं अतिशयोक्ति ठरणार नाहीं. दापोलीच्या परिसरात वास्तव्य करणाऱ्या अण्णासाहेब, मुकुंदा, त्याची आई, बहिण आकू ह्या छोट्याशा कुटुंबाच्या जीवनाचें चित्रण त्याच्या 'अव्वाच्यासव्वा घरांत करताना वास्तुमर्यादेशिवाय पात्रमर्यादेचें घालून घेतलेलें बंधन लेखकाला वास्तविक अडचणीचें आणि वाचकाला कदाचित् कंटाळवाणें ठरलें असतें. पण ह्या दोन मर्यादांच्या भरीला कालमर्यादेचें बंधन जोडून ॲरिस्टॉटलनें नाट्याविष्कारासाठीं आवश्यक मानल्या गेलेल्या कलात्मक एकात्मतेची त्रयी बर्व्यांनीं अतिशय यशस्वीपणें हाताळली आहे. केवळ सोबत म्हणून कुटुंबांत सामावलेल्या बाळाभाऊ आणि वेणा ह्याच्या कथानकातल्या प्रवेशापासून कादंबरीतलें नाट्य सुरू होते आणि याच्याच निर्गमनानें नाट्य (आणि कादंबरीही) संपतें हें उचितच वाटतें. प्रादेशिक कादंबऱ्यांतला परिसराच्या तपशिलवार वर्णनांचा फाफटपसारा, अर्वाच्य रांगड्या शब्दांच्या अधूनमधून केलेली पेरणी, आणि कथेंतल्या पात्रांच्या विकृत वागणुकीचे रसाळपणें वर्णिलेलें किस्से इत्यादि प्रादेशिक कथासाहित्याचा 'एक्स्पर्ट फॉर्म्युला' समोर ठेवून न लिहिल्यामुळें बर्व्यांच्या ह्या कादंबरीला एक चटकदार व अपरिचित वास येतो. कादंबरीच्या नांवापासूनच साध्या आणि सिध्या शैलीला चिकटून राहण्याच्या बर्व्यांच्या प्रयत्नामुळें—विशेषतः संवादात्मक कथनाच्या शैलीमुळें—ही कादंबरी ओघवती झालेली आहे. एका वकिलपेशांतल्या मध्यमंवर्गीय कुटुंबाच्यां जीवनांत पावसाच्या (आणि पावसानें भिजलेल्या मातीच्या वासानें उठवलेल्या) चक्रीवादळानें केवढा हाहाःकार उठूं शकतो ह्याचें नाट्यपूर्ण चित्रण समर्थपणें करणाऱ्या बर्व्यांना धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. कमकुवत आकू आणि तिचे पिळदार यजमान अप्पासाहेब, तसेंच निरिच्छ बाळाभाऊ आणि त्यांची अतृप्त पत्नी वेणा ह्या विजोड जोडप्यांच्या कौटुंबिक संघर्षाचें चित्रण बर्व्यांनीं अनादिकालापासून हमखास आकर्षक ठरणाऱ्या मानवी कामव्यवहाराची निरगाठ व उकल ह्या तंत्रशुद्ध पद्धतीनें (अलिकडच्या काहीं 'यशस्वी, कादंबरीकाराप्रमाणें) केलें असतें तर वाचकांची आणि (कालांतरानें सरकारचीही) मेहेरनजर कादंबरीकडे वळली असती. पण स्तुत्य संयम राखून आवश्यक अशा सूचक घटनांचाच आधार घेऊन बर्व्यांनीं कथानक आणि पात्रेंही अश्राप राखलीं आहेत. कथानकाला पाल्हाळाची जोड देऊन कादंबरी भव्य आणि विस्तृत करणें सुलभ ठरलें असतें पण योग्य घटनाप्रसंगीं (आणि वाचकाला चुटपूट लागावी इतक्या अचानक) नाट्यावर पडदा पाडून कादंबरीचें तंत्र पहिल्याच प्रयत्नांत श्री. बर्व्यांनीं अतिशय यशस्वीपणें आत्मसात केलें ह्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें इष्ट ठरेल. समीक्षणात कथानकाचा तपशील देण्याची प्रचलित पद्धत टाळण्याचें कारण वाचकानें ही कादंबरी वाचावी हेंच आहे. दलालाचें आकर्षक व अर्थपूर्ण मुखपृष्ठ, पुस्तकाची रेखीव छपाई आणि बर्व्यांची साहित्यिक पुण्याई ह्या आकर्षणांनीं ह्या 'मातीचा वास' घेऊं पाहणाऱ्या वाचकाला एका अननुभूत हुरहुरीचा प्रत्यय येईल अशी स्वानुभवावरून खात्री देणें समीक्षकाला युक्त वाटतें. निदान ह्या कादंबरीच्या बाबतींत समीक्षकानें अधिक शवच्छेदन करून व्यवच्छेदक लक्षणांचें निरर्थक संशोधन वा मूल्यमापन करून अभिजात सौंदर्य उपभोगायची रसिक वाचकाची पात्रता आणि हक्क हिरावून घेऊं नये असें सुचवावेसें वाटतें.

(**मातीचा वास** लेखक:—अच्युत बर्वे, पुणें. कॉन्टिनेन्टल प्रकाशन, १९६२, पृ. १९८; किंमत पांच रु.)

—शां. शं. रेगे



अनुक्रमणिका

# पिळदार आणि जिद्दी नायकाची कथा

'अलगूज' ही अण्णाभाऊ साठे यांची नवी कादंबरी. कादंबरी वाचत असतांना एक गोष्ट अगदीं प्रकर्षानें जाणवते कीं, तिच्यांत विलक्षण वेधकता आहे. वाचकाला गुंग करून टाकण्याची तिच्यांत शक्ति आहे. ह्याचें प्रमुख कारण म्हणजे कादंबरी ही ग्रामिण विभागांत आकारास आली आहे. तेथील व्यक्तीचें तत्वज्ञान, त्याची वागण्याची तऱ्हा आणि आंधळी ईर्षा आणि आगळी जिद्द ह्यांच्या संमीलनांतून चांगली कलाकृती निर्माण झाली आहे. वारणेच्या खोऱ्यानें त्यांना अनंत कथाबीजें पुरविलीं आणि तीं सारीं अण्णाभाऊंनीं कुशलतेनें हाताळलीं.

'अलगूज' मध्येंहि प्रेमाचा त्रिकोणच आहे. गणू मोहित्याची तरणीताठी व नक्षत्रासारखी मुलगी रंगू आणि त्याच्याकडे गुरें वळण्याचें काम करणारा, शेतीवर राबणारा व अलगुजाचे सूर छेडणारा बापू खारवते परस्परावर जीव टाकतात. बापू खारवते अंगापिंडाने मजबूत, परिस्थितीनें इतका गरीब कीं, गरीबीमुळेंच त्याला शाळा अर्धवट सोडून गुरें वळविण्याचें काम पत्करावें लागतें. त्याच नादगावच्या पोलिस पाटलाचा मुलगा लक्ष्या ह्याचेंहि रंगूवर नितांत प्रेम असतें. इतकें कीं, तो तिच्यासाठीं वेडावतो. देवऋषी करतो. अंगारे धुपारे, खारूक्या मारून रंगूच्या पावलाची माती मिळविण्यासाठीं वेडापिसा होतो.

नादगावच्या हाणमा पाटलाची दुसरेपणाची बायको हौसा ही मानगांवच्या बळी ह्या पोलिस पाटलाची बहिण असते. तिचा बळी हा सावत्र भाऊ असतो. तर लक्ष्या सावत्र मुलगा असतो. आणि हाणमा पाटील वृद्धावस्थेमुळें निकामी झालेला असतो. हौसाचा सख्खा भाऊ चितू हा भेकड, दुर्बल व मोठ्या भावाच्या बलदंड व्यक्तित्वानें पिचलेला असतो. तेव्हा चितूसाठीं बायको म्हणून रंगूची निवड हौसा करते. स्वतःच्या वासनेसाठीं तिचा उपयोग करून घेता येईल ह्या हलकट इच्छेनें बळी पुढाकार घेतो. आपल्यासारख्या 'रंडया'ला तिनें गणू मोहित्याच्या कुऱ्हाडीचों धाक घालावा, घरीं गेलो असतां तिखटमिठाचा चहा द्यावा हें शल्य बळीला छळत असतें आणि अशांतच लक्ष्याचा खून होतो आणि फौजदाराच्या हुषारीनें व प्रकाश मास्तरांच्या तत्परतेनें आणि बापूच्या बेडर जिद्दीनें खरा खुनी रामोशी व त्याला प्रेरणा देणारा बळी पकडले जातात आणि अखेर बापू व रंगूचें शुभमंगल होतें. असें हें कथानक आहे.

राबणारा आणि राबवणाऱ्या वर्गांतील कलहाचे हें जसें चित्रण तसेच प्रेमाच्या पातळीला नामंजूर असलेला हा भेद ह्यांचेही दिग्दर्शन आहे.

आपली कूस पिकावी म्हणून बापू खारवतेच्या देवऋषी काकाशी चोरटा अनैतिक संबंध ठेवणारी हौसा ठसठशीत उभी राहते. देवांना शिव्या देणारा, गांजाच्या तारेंत गुंग राहणारा, भोळेपणाचा फायदा घेऊन पैसा उकळून गांवावर जरब ठेवून वागणारा डोकेबाज नामा फार उत्तम रेखाटला गेला आहे.

हाणमा पाटलाचा पोरका पोरगा लक्ष्या ह्याचें चित्रण मात्र अण्णाभाऊंना जसें करायचें तसें जमलें नाहीं. आरंभाला तो खलनायक वाटतो पण उलट तो वाचकांची सहानुभूतीच मिळवितो आणि गुरवाच्या पुढ्यात हृदयात शिरलेल्या भाल्याच्या प्रहारानें झालेला त्याचा दुर्दैवी अंत चटका लावून जातो.

वातावरण शहरापासून दूर असलेल्या खेड्यांतील आहे. आठवडयाच्या बाजाराची धमाल गर्दी, लक्ष्याच्या कुस्तीचा उल्लेख, भानामतीचे, प्रयोग, फिरत्या चोरट्या वसाहती, कुऱ्हाडीच्या माऱ्यामाऱ्या, लग्नाचीं बोलणीं, जारणमारणाच्या तांत्रिक बाबी आणि त्यांचा भोंगळपणा, बदलत्या निसर्गाचीं लोभस वर्णनें ह्यानीं कादंबरीस फारच रंगत आणली आहे.

प्रमुख पात्रातील बापू, गणू, रंगू, बहिणा, बळी, नामा व हौसा ह्याचें स्वभावदर्शन फार प्रभावी उतरलें आहे. फौजदाराचें पात्र अकारण उदार दाखविल्याची जाणीव होतें. इतकेंच नव्हें तर तरुण-तरुणीविषयक आपलें तत्वज्ञान सांगण्याचा मोठाच मोका अण्णाभाऊंनी साधलेला दिसतो. तसेंच कादंबरीच्या आरंभाला गडप होणारा पक्या नंतर प्रकाश मास्तर बनून काहीं काळ लुडबुडतांना दाखविला गेला आहे. बाकीचीं पात्रें एवढा खोल परिणाम साधतात कीं, त्या दृष्टीनें प्रकाश मास्तरांची व्यक्तिरेखा उपरी वाटते.

'अलगूज'मध्यें नाट्यपूर्णता फार मोठया प्रमाणांत आहे. इतक्या मोठ्या प्रमाणांत कीं, ती नाट्यपूर्णता वास्तव्याच्या सीमेबाहेर सांडून अपेक्षाभंग करते पण ह्याचें कारण कदाचित 'अलगूज'चें लेखन करीत असतांना कादंबरीच्या पुरकथेबद्दलचा विचार अण्णाभाऊंच्या मनांत डोकावत असावा हेंच असावेसें वाटतें.

अण्णाभाऊंची भाषाशैली रसरशीत आहे. चैतन्यानें मुसमुसलेली आहे. बळीच्या वासनेला फटकारल्यानंतर रंगूची दुरून दिसणारी पाठ प्रत्यक्ष मोठी कुऱ्हाड तळपतांना दिसण्याचा उल्लेख अत्यंत वेढून टाकते. बापूच्या भेटीसाठीं पुढें जाणाऱ्या रंगूचें वर्णन ते करतात— 'बापूनं हांक मारली आणि धनुष्याचा बाण सुटावा तशी ती पुढं धांवली नि गप्पकन बापूच्या बाहूंत गडप झाली.' 'रात्र भरलेल्या घागरीसारखी हिनकळत होती.' वगैरे शैलीचें नमुने आहेत.

छोटया छोटया वाक्यांनीं ते फार मोठी परिणामकारकता साधतात. 'आषाढ निघाला. थंड वाऱ्यानं कहर केला. तळवट भिजून चिंब झाला. 'जमीन गारावली' किंवा 'ताशा तरकला. सूर घुमूं लागला. सनईनं वातावरणं गुंग केलं.' अशी चित्रदर्शी भाषा गुंग करून टाकतें— आणि श्री. विश्राम बेडेकरांच्या 'रणागण' मधील शैलीचा आस्वाद नव्यानें घेतल्याचा कैफ चढतो.

बापू खारवते त्यांनी हाडामांसाचा घडवला आहे. त्याची निष्ठा, समजूतदारपणा, जिद्द आणि झुंज अत्यंत प्रभावी आहे. 'मी कुणालाच भीत नाहीं. मलाहि बळ आहे, आणि रागहि आहे'-असें बोलून गणू मोहितेची कुऱ्हाड खसकन ओढून तिचा दांडा मांडीवर मोडून शांतपणें निघून जाणाऱ्या बापूचा पीळ आटवणीत रुतून बसतो.

जातां जातां आणखी एक मुद्दा बापूसंबंधी लक्षांत येतो तो असा कीं, 'अलगूज' चा कथानायक 'बापू' आहे. तो पिळदार आहे. जिद्दी आहे तसाच अफाट आहे. आणि श्री. श्री. ना. पेंडसे ह्यांचाहि गारंबीचा 'बापू' असाच आहे. नामसाधर्म्यावरून ह्या दोन बापूंची तुलना करण्याचा मोह होतो एवढेच नाही तर त्याच्या स्वभावातील चढती कमान पाहिली तर असें वाटते कीं, कदाचित ह्या गारंबीकर बापूला शह देण्याची ह्या बापू खारवतेची जिद्द असेल आणि तसें असलें तर बापू खारवते डावा पडतो असें म्हणावें लागेल.

वेधकता हा अलगूजचा मुख्य गुण आहे. प्रसन्न भाषाशैली हें तिचें मोठें यश आहे तर 'अलगूज' ह्या नांवातील निरर्थकता हें तिचें वैगुण्य आहे असें म्हणावें लागेल.

**(अलगूज लेखक—अण्णाभाऊ साठे, प्रकाशक-मॅजेस्टिक बुक डेपो, किंमत ४ रु. पृष्ठे १४४.)**

**—केशव मेश्राम**

# ज्ञानसाधनेचा रत्नगौरव

मुंबईचें एक भूषण, ज्ञानतपस्वी डॉ. पां. वा. काणे ह्यांना भारत सरकारनें 'भारतरत्न' ही पदवी देऊन त्यांचा यथोचित गौरव केला ह्याबद्दल कोणालाही आनंद होईल. गिर्वाण भाषा काण्यांच्या घरीं पाणी भरते असें म्हटलें तर तें अतिशयोक्तीचें ठरूं नये एवढा त्यांचा संस्कृत भाषेचा गाढ व सर्वगामी अभ्यास आहे. विद्यार्थीदशेपासून संस्कृत विषयांत सतत सर्वश्रेष्ठ प्राविण्य व पारितोषिकें मिळवित काणे एम्. ए. झाले. पुढें वकिलीच्या परीक्षा दिल्यानंतर त्यांनी वकिलीचा व्यवसाय सुरूं केला. व्यवसायात राहूनही त्यांनीं दोन व्यासंग सोडले नाहींत एक सकाळीं तासभर फिरण्याचा आणि दुसरा एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथालयांत सायंकाळीं तास दोनतास ज्ञानसाधनेचा. त्यांनीं लिहिलेला धर्मशास्त्राचा सहा हजार पानी व पांच खंडी इतिहास म्हणजे त्या विषयावर अधिकृत व अखेरचा शब्द मानला जातो. गेल्या वर्षीच त्यांनीं हा भव्य संकल्प पुरा केला आणि डॉ. राधाकृष्णन् ह्यांनीं शेवटच्या खंडाच्या प्रकाशनप्रसंगीं काढलेले गौरवपर उद्गार प्रस्तुत पदवीनें साकार केले आहेत. काणेसाहेबांना प्राप्त झालेली महामहोपाध्याय ही पदवी सार्थ ठरावी एवढें त्यांचें इतर कर्तृत्वही उच्च दर्जाचें आहे. डॉ. काण्यांनीं प्राच्यविद्या परिषदात अनेक वेळा भारताचें प्रतिनिधित्व करून आपल्या प्रगाढ विद्वत्तेनें भारताला महत्वपद प्राप्त करून दिलें आहे. लंडन स्कूल ऑफ ओरिएन्टल स्टडीजचे एकमेव भारतीय फेलो, इतिहास परिषदेचे अध्यक्ष, राज्यसभेचे सदस्य, मुंबई विद्यापीठाचे कुलपति आणि प्राच्यविद्येचे राष्ट्रीय प्राध्यापक हे सन्मान काण्यांना एका पाठोपाठ एक मिळत गेले ह्याचें कारण त्यांची निःस्पृह ज्ञानसाधना हेंच होय. मुंबई विद्यापीठानें नुकतीच त्यांना सन्माननीय डॉक्टरेट समारंभपूर्वक अर्पण करून त्यांच्या यशप्राप्तीवर कळसच चढवला. 'सुदैवच आपल्या पाठीं हात धुवून लागलें आहे' असें आपल्याबद्दल नम्रतेनें उद्गार काढणारे डॉ. काणे साधे, सीधे आणि प्रसिद्धीपराङ्मुख आहेत. 'विद्वान सर्वत्र पूज्यते' ही उक्ति त्यांच्या बाबतींत अक्षरशः खरी ठरली आहे. डॉ. काण्यांना आम्हीही नम्रपणें अभिवादन करून त्यांच्या हातून अशीच ज्ञानसाधना घडत रहावी असें चिंतितों.

—सारस्वत

# एका रसिक माणसाची यशस्वी वाटचाल

श्री. रत्नाकर बाळकृष्ण मानेलकर यांची 'जनता संपर्काधिकारी' म्हणून मध्य रेल्वेनें नेमणूक केली. मानेलकरांच्या परिचितांना ही गोष्ट निःसंशय आनंदाची आहे. मनमोकळा सुस्वभाव, आनंदी वृत्ति, चतुर संवादी आणि या सर्वांवर कळस म्हणजे त्यांची रसिक कलावंत वृत्ति. अशी वृत्ति पूर्वसुकृतानेंच लाभते.

श्री. मानेलकरांनीं आपल्या रसिक वृत्तीला व्यासंगाची साथ दिलेली आहे. घन आणि सुषीर वाद्यांवर ज्यांचें प्रभुत्व असतें अशीं माणसें फारच विरळा—मानेलकर तबल्याचे जाणकार आहेत. हार्मोनियम व बांसरी हा त्यांचा आवडता छंद आहे व या तिन्ही वाद्यांवर त्यांचें चांगलेंच प्रभुत्व आहे. असा माणूस आपल्या कार्यक्षेत्रांत यशस्वी झाला नाहीं तरच नवल. मानेलकरांचे आम्हीं अभिनंदन तर करतोंच; पण त्यांच्या यशाची कमान चढती राहो अशी मनःपूर्वक इच्छा व्यक्त करतो. • • •

# सर्वश्रेष्ठ मानाचा कलावंत

बॉम्बे आर्ट सोसायटीच्या नव्या कमिटीनें या वर्षी एक आदर्श असा पायंडा पाडला. यापुढें प्रतिवर्षी सर्वमान्य अशा एका कलावंताची निवड करून त्या वर्षीचा 'सर्वश्रेष्ठ कलावंत' म्हणून त्याचा गौरव करून त्याला मानपत्र द्यायचें, असा हा पायंडा आहे. हा कलावंत तीन बाबतींत योग्य ठरला पाहिजे. पहिली गोष्ट म्हणजे आपले सबंध आयुष्य त्यानें चित्रकलेला वाहिलेलें असलें पाहिजे. दुसरी—तो चालू स्थितींत काम करीत असला पाहिजे व तिसरी म्हणजे आपल्या राष्ट्राला त्याचा कांहींतरी गौरवपूर्ण उपयोग झालेला असला पाहिजे.

या तिन्हीं बाबतींतल्या योग्यतेस पात्र ठरलेला व यंदाचा 'सर्वश्रेष्ठ कलावंत' म्हणून शिल्पकार श्री. वि. पां करमरकर यांची निवड झाली व मानपत्र देऊन त्यांचा गौरव करण्यांत आला. चित्रकारांच्या संस्थेनें अशा रीतीनें केलेला हा पहिलाच गौरव आहे व या गौरवास पात्र ठरल्याबद्दल आम्ही श्री. करमरकरांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. • • •

## खुलासा

फेब्रुवारी १९६३ च्या दीपावलीच्या मुखपृष्ठावरील 'जवानां'च्या चित्राचे हक्क मे. बेनेट कोलमन अ‍ॅण्ड कं. कडे असून त्यांच्या सौजन्यानें आम्हीं तें प्रसिद्ध केलें आहे.

—प्रकाशक

अनुक्रमणिका

# परंपरा विसरलेलें निष्प्रभ चित्र-प्रदर्शन

जसजसें जग बदलत गेलें तसतसें त्या जगांतलें कलाविश्वहि बदललें. चित्रकलेच्या व शिल्पकलेच्या विश्वांत तर नित्य क्रांतिकारक स्थित्यंतरें घडत आहेत. पाश्चात्य देशांतल्या कलासृष्टींत नाना तऱ्हेचे विचारप्रवाह नित्य खळाळून वाहात असतात. सहाजिकच त्याचा परिणाम भारतावरहि होतो. अशा नव्या परिणामाची योग्य दखल घेऊन कलावतांत आत्मविश्वास उत्पन्न करून त्यांना नवचैतन्य देणारी महाराष्ट्रांतील जुनी आणि जाणिती अशी एकमेव सस्था म्हणजे बॉम्बे आर्ट सोसायटी होय. थोड्याच कालावधीनतर ही संस्था हिरकमहोत्सव साजरा करील. पूर्वी या संस्थेचें प्रत्येक प्रदर्शन म्हणजे चित्रकलेंतील बदलत्या काळाचें प्रातिनिधिक स्वरूप होतें. या सस्थेचें सुवर्णपदक मिळविणें म्हणजे प्रत्येक चित्रकाराला आपल्या आयुष्यांतलें तें एक महत्वाचें मानचिन्ह वाटत असे. त्यासाठीं वर्षानुवर्षे अखंड साधना आणि धडपड चालू असे; किंबहुना या प्रदर्शनांत भाग घेणें म्हणजेच एक बहुमान असे. त्यामुळें अहमहमिकाहि होती. एक फार मोठी परंपरा या मागे होती. श्रेष्ठ कलागुण आणि नाविन्य याबरोबर साधनाहि जमेस धरली जाई; पण अलीकडे ती परंपराच कोसळल्यासारखें वाटतें. असें कां हें मात्र कळत नाहीं. असो !

प्रदर्शनालाहि परंपरा होती. आतांपर्यंत जीं प्रदर्शनें भरत होतीं तीं तैलचित्रें, जलचित्रें, पेस्टल, शिल्प अशा तांत्रिक वेगळेपणाचेच भाग पाडून; परंतु या वर्षीच्या ७२ व्या प्रदर्शनांत नव्या दमाच्या कमिटीनें या परंपरे· विरुद्ध बंड केलेलें दिसलें. नाविन्याच्या आहारीं जाऊन त्यांनीं या प्रदर्शनाचा एकप्रकारें चुथडाच केलेला आहे, हे हें प्रदर्शन पाहून झाल्यानंतर वाटल्याशिवाय राहात नाहीं. प्रदर्शनाचे चार गट पाडून त्यांना बक्षिसेंहि समप्रमाणांत ठेवलीं. त्यामुळें श्रेष्ठ कलाकृतीची महत्ता त्याचप्रमाणें सुवर्णपदकाचा सर्वोच्च मानहि राहिला नाहीं.

एखाद्या शास्त्रीय संगीताच्या भरतीदार व गंभीर अशा अलापींत मध्येंच उडत्या संगीताचे हलके व रसहानी करणारे स्वर यावेत आणि गांभिर्याचा भंग व्हावा तसें या प्रदर्शनांत पदोपदीं जाणवतें. एखाद्या वजनदार कलाकृतीच्या शेजारीं एखादी अतिसामान्य कलाकृति ठेवायची किमयाहि हें प्रदर्शन मांडणाऱ्यांनीं केलली आहे. त्यामुळें त्या शेजारच्या वजनदार कलाकृतीची मानहानी तर झालेलीच आहे; पण एकंदर प्रदर्शनाचा दर्जाच त्यामुळें घसरला आहे. हें सारें कशामुळें झालें असावें—हा राहून राहून प्रश्न पडतो. आधुनिक, भारतीय, वास्तव, अतिवास्तव अशी वर्गवारी केली म्हणून तर हें झालें नसावें ? बरें ! अशी नुसती वर्गवारी करूनहि कमिटी थांबली नाहीं. तिनें चार वेगवेगळ्या निवड समित्या नेमल्या. चारी वर्गांना सारखीं 'बक्षिसें' ठेवलीं.

परंतु असें लोकशाही तत्व आत्मसात करून सर्वांनाच खूप केल्याचें समाधान जरी नव्या विटीला लाभलेलें असलें, तरी अनेक मतप्रवाहांच्या निवडीनें प्रतिष्ठेचा मात्र विचका झाला. सर्वमान्य, सर्वखूष असें तत्व आत्मसात करून बऱ्याच वर्षांपूर्वी 'आर्ट सोसायटी ऑफ इंडिया' या संस्थेनेंहि आपल्या प्रदर्शनाचा असाच विचका केलेला होता. त्याची आठवण सुबुद्ध कलावंत अजून विसरले नसतील. नव्या कमिटीनें कांहीं चांगल्या गोष्टीहि केल्या त्याचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. हस्तिदंतावर अतिसूक्ष्म पद्धतीनें चित्रण करणाऱ्या दिल्ली येथील मन्सूर घराण्यांतील वंशजांना मुद्दाम पाचारण करून त्यांच्या कलाकृतींचा एक स्वतंत्र विभाग या प्रदर्शनांत ठेवलेला होता. तो अत्यंत वेधक वाटला. परप्रांतांतील चित्रकारांना आमंत्रण देऊन त्यांच्या कलाकृति आपल्या प्रदर्शनांत लावण्याची प्रथाहि चांगली वाटली; परंतु कलकत्त्याच्या पाहुण्यांनी निराशा केली. एकंदरींत जुन्या नाणावलेल्या चित्रकारांची गैरहजेरी· नवोदितांनी केलेला अपेक्षाभंग व होतकरूंचा कोंवळेपणा यामुळे हें ७२ वें प्रदर्शन आपला पारंपारिक प्रभाव पाडूं शकलें नाहीं.

कलांध

## साभार-पोंच फेब्रुवारी ६३

**१ काळोखांतील काजवे**
लेखक-रामचंद्र हिंगणे, प्रकाशक-नलिनी साहित्य प्रकाशन रु. १-५०

**२ मधुधारा**
लेखक-मा. गो. काटकर, प्रकाशक-पंडित अनंत कुळकर्णी. रु. २-५०

**३ हें विश्वची माझें घर**
लेखक-रवींद्रनाथ टाकुर, मौज प्रकाशन गृह. रु. १०

**४ बालकवि**
लेखक-कृ. बा. नराटे, मौज प्रकाशन गृह रु.१२-५०

**५ पोपटी चौकट**
विद्याधर पुंडलिक, मौज प्रकाशन गृह रु. ५-५०

**६ वेलांटी**
कान्त, मौज प्रकाशन गृह, रु. ४-५०

**७ व्यासपर्व**
दुर्गा भागवत, मौज प्रकाशन गृह. रु. ३-५०

**८ भाषा आणि संस्कृति**
ना. गो. कालेलकर, मौज प्रकाशन गृह, रु. ७-५०

**९ प्रो. विजापूरकर यांचे लेख**
सं.-मु. गो. देशपांडे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन. रु. १५

**१० अर्वाचनी मराठींतील खंड काव्यें**
ले. ह. कि. तोडमल, कॉन्टिनेन्टल प्रकाशन. रु. १५

**११ सांगावा**
ले. शंकरराव खरात, कॉन्टिनेन्टल प्रकाशन. रु. ३-५०

**१२ पराधीन सरस्वती**
डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन. रु. ५

**१३ पेरणी**
ले. रा. रं. बोराडे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन. रु. ३-५०

**१४ शारीरिक शिक्षण व लष्करी शिक्षण**
डॉ. कृ. न. जेजुरीकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन. रु. ३-५०

**१५. कांहीं शैक्षणिक समस्या**
डॉ. कृ. न. जेजुरीकर अभिनंदन ग्रंथ, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, रु. ३-५०

**१६. मराठी कथा '६२**
संयोजक अरविंद गोखले, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, रु. ३-५०

पान २१ वरून...

प्रकार आजचे कलावान् उपभोगीत आहेत ! शेकडा ९० टक्के चित्रकार छातीठोकपणें सांगत असतात कीं त्यांनीं कुठल्याच शाळेंत कलेचे धडे घेतलेले नाहींत ! कारण कला शिकणें म्हणजे स्वतःचें व्यक्तित्व व स्वातंत्र्य घालवणें अशीच यांची कल्पना आहे ! ! आणि हेच विचार दुर्दैवानें आपल्याकडे पण येऊं पहात आहेत.

आतां प्रदर्शनांतील प्रत्यक्ष चित्रें पाहूं.

मुख्य बक्षिसाचा मालक मानेसिएर मला तरी आवडला नाहीं. इतरांचें मत पण तसेंच पडलें. त्याच्या चित्रामध्यें चित्रत्व (Plastic Quality) कमी असून.मुख्य भर decoration कडे आहे असें वाटतें. जांभळा व निळा रंग त्यांना आवडता आहे.. पण चित्राची उठाव कापडाच्या नमुन्यासारखा वाटतो ( Textile design ). त्यापेक्षां ( Poliakoft ) ( फ्रांस ), Sironi ( इटली ), Giacomtti ( स्विस ), Francis Bacon ( इग्लंड ) यांच्या कृती जास्त आकर्षक व सुंदर वाटल्या. Albert Schelling या स्विस शिल्पकाराचें काम Abstract form मध्यें असूनही हें फार उत्तम होतें. पितळ व दगड यांत हें काम केलेलें होतें–त्या माध्यमांत कलावान किती सुंदर व साधे आकार निर्मू शकतो याचें आश्चर्य वाटलें.

सर्व देशांतमधील चित्रकारांत abstract व non-figurative चित्राकडे कल दिसतो. फक्त Russia मधील चित्रें मात्र वस्तुनिदर्शक (realistic) पद्धतीनें रंगवलेलीं होतीं. तसेंच Irish चित्रांमध्यें Impressionistic पद्धतीनें रंगविलेलीं दिसलीं. सगळ्यांत दरिद्री विभाग तुर्कस्थान, इराण, हिंदुस्थान व ब्राझील यांचा वाटला. हिंदी चित्रकलेचे नमुने पाहून तर मलाही साश्चर्य वाईट वाटलें. माझ्याबरोबरच्या इटालियन चित्रकारानें तर विचारलें कीं हीं चित्रें तर इतर कुठल्याही देशांत रंगवल्यासारखीं वाटतात. त्याची कल्पना होती की कांहीं चित्रें तरी हिंदी चित्रकला निदर्शक असतील ! पण आपलें सरकारी धोरण फक्त आधुनिक कलेचा पाठपुरावा करण्याकडे आहेसें दिसतें. रावळ, अलमेलकर किंवा कपूर यांच्या चित्रांचे नमुने इकडे कितीतरी उठून दिसले असते. पण आमच्याकडे कलाविश्वांतल्या सर्वच गोष्टी पॅरिसच्या धर्तीवर चालू आहेत. त्याला काय करावयाचें ? पाश्चात्यांचें अंधानुकरण हीच आपली आधुनिक कला. निदान सरकारी अधिकृतरीत्या जीं चित्रें बाहेर पाठविलीं जातात, त्यांत सर्व प्रकारच्या चित्रांना सारखा वाव द्यावा म्हणजेच सध्याच्या हिंदी कलेचें खरं मूल्यमापन होऊं शकेल.

प्रदर्शनांत कांहींतरी नवीन करण्याच्या स्पर्धेमुळें कायकाय विचित्र प्रकार आढळतात हें पाहण्यासारखें आहे.

(१) कॅनव्हासर कातड्याचे तुकडे चिकटवून व शिवून केलेलें हिप्पोचें चित्र ( हिप्पोचेंच कातडें तर लावलें नसेल ना ? )

(२) लाकडाचे तुकडे, धातूचे पत्रे कॅनव्हासवर चिकटविणें व त्यावर रंगवणें (Tornerची चित्रें)

(३) Mosaic सारखे ठोकळे फ्रेममध्यें बसवून ते रंगवणें ( Biasco ची चित्रें ).

(४) कॅनव्हासवर कागदाचे तुकडे चिकटवून design व Texture आणणें.

(५) कॅनव्हासवर रंग लावून तो जाळणें.

(६) सर्व Canvas पांढरा ठेवून त्यावर ४ काळे पट्टे ओढणें.

(७) धातूच्या पत्र्यावर निरानिराळे रंग ओतून ते हलवून हलवून त्याचे design बनवणें वगैरे वगैरे.

एकंदरींत पाहिलें तर चित्रकार व टीकाकारांच्या मतें या वर्षीचें प्रदर्शन कमी प्रतीचें आहे. त्यांत एक टीकेचा मुद्दा हा आहे की बक्षिसें विभागली जाऊं नयेत. एका चित्रकारालाच संपूर्ण बक्षिस द्यावें. चित्रांची निवड जास्त चांचणीपूर्वक व्हावी–ही दुरुस्ती सूचना दिसली. जगांतील अत्युच प्रदर्शन म्हणून याकडे पाहतात, म्हणून तर याची जास्त काळजी घेतली पाहिजे असें एका इटालियन मित्राचें म्हणणें संयुक्तिक वाटतें. ● ● ●

पान ७ वरून

यती होत्या. उन्हाळ्यांत शीतोपचार आणि हिवाळ्यांत उष्णोपचार यांची सामग्री सज्ज होती. ती पाहून भोज थक्क आणि तृप्त झाला.

दुसऱ्या दंतकथेप्रमाणें माघानें आपलें धन दानांत लुटलें आणि तो दरिद्री झाला. तेव्हां त्यानें शिशुपालवध काव्य लिहून भोजाकडे पाठविलें. भोजानें त्यांतील एकाच अक्षराची किंमत एकलक्ष केली. पण तेंही धन दानांत लुटून माघ शेवटीं उपासमारीनें मृत्यू पावला.

या दंतकथा संपूर्ण असत्य होत. कारण भोजराजा हा माघानंतर चारशें वर्षांनीं झाला आहे. पण कालिदासाच्या दंतकथा स्त्रीविषयक आहेत, भारवीच्या दंतकथा विचारशीलतेबद्दल आहेत, जयदेवाच्या दंतकथा कृष्णभक्तीबद्दल आहेत यांत जसा सखोल अर्थ आहे तशाच माघाच्या दंतकथा लाखांच्या उलाढालीच्या आहेत यालाही अर्थ आहे.

मात्र हा वैश्य असून त्यानें ब्राह्मणाकडून काव्य लिहून घेतलें असाही एक प्रवाद आहे. पण त्याचा विचारही करावयास नको. वैश्य काव्य लिहूं शकत नाहीं असें वेदवाक्य थोडेंच आहे !

—आनंद साधले

**Statement about ownership and other particulars about newspaper 'DIPAVALI' MONTHLY**

**FORM IV (SEE RULE 8)**

| | |
|---|---|
| 1. Place of publication... | Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bomber-4. |
| 2. Periodicity... | Monthly, on 1st of every month. |
| 3. Printers' Name... | Shri Dinanath Damodar Dalal. |
| Nationality... | Indian |
| Address... | 42, Kennedy Bridge, Bombay-4 |
| 4. Publishers' Name, Natiouality and Address... | As per 3 above. |
| 5. Editors Name, Nationality and Address... | As per 3 above. |
| 6. Names and addresses of individuals who own the newspaper and partners or shareholders holding more than one percent of the total capital. | Shri Dinanath D. Dalal, Sole proprietor. No partners or Shareholders. |

, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 20-2-1963

**D. D. Dalal**

Signature of publisher

